# इंदिरा.

१९०१ व १९०३ या सालांच्या "स्कूल फैनल" साठीं.

हें नवीन काव्य

लेफ्टेनन्ट कर्नल

**कान्होबा रणछोडदास कीर्तिकर**

इंडियन् मेडिकल सर्व्हिस, जिल्हा रत्नागिरी येथील

सिव्हिल सर्जन,

'**भक्तिसुधा**' आणि '**विलापलहरी**' या कवितावद्ध

ग्रंथांचे कर्ते

यांनीं रचिलें; त्याची ही

दुसरी आवृत्ति

**वेदशास्त्रसंपन्न राजाराम रामकृष्ण शास्त्री भागवत**

मुंबई सेन्ट क्झेवियर पाठशाळेंतील संस्कृत अध्यापक,

यांच्या साह्यानें शुद्ध करून,


**मुंबईंत**

"निर्णयसागर" छापखान्यांत छापविली.

सन १९०१, शके १८२३.


**अर्धं भार्या मनुष्यस्य, भार्या श्रेष्ठतमः सखा,**

**भार्या मूलं त्रिवर्गस्य, भार्या मूलं तरिष्यतः. १**

महाभारत—वधूदर्पणांतील उतारा.

पहिल्या आवृत्तीचें

## पुस्तकार्पण.

**श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड**

सेना खासूखेल समशेर बहादूर संस्थान बडोदें,

यांप्रत, सानुमतें अत्यादरें हें काव्य

**अर्पण केलें असे.**

**श्लोक.**

विद्यारत्नसुपारख्या, बुध-नरा, विद्वन्मणीपालका !
ज्ञानी शुद्ध असोनि जो निजजनां, देशी सुखा सेवकां;
शूरांचें अभिधान दिव्य कुळिंचें साजे **सयाजी** जया;
अर्पीं सादर **इंदिरा** नृपवरा ! स्वीकारिं काव्यासि या !

दुसऱ्या आवृत्तीचें

# पुस्तकार्पण.

---

## श्रीमती विदुषी रमाबाई रानडे

यांच्या चरणीं **इंदिरा** काव्याची ही दुसरी आवृत्ति

अर्पण केली असे.

---

श्लोक. (शिखरिणी).

**रमा**! स्त्रीवर्गीं ज्या प्रमुख विदुषी साच दिसतां,
स्त्रियांच्या उत्कर्षा सतत बहु सप्रेम झटतां;
असोनी ज्ञानी हो! सुविनयभरें पूर्ण सजलां!
सुशोभा देताहां अगणित, अहो आर्य-महिलां;
स्त्रियांच्या दैन्यातें हरण करण्या तत्पर असां;
स्त्रियांमाजी आजी गुणमणि मला दिव्यचि दिसां;
"स्त्रियां जैशा वंद्या" सुजन वदती "तेविं हि नरां;"
तुह्मां पायीं अर्पीं कवन मम हें जोडुनि करां! २

साकी.

**गायकवाडी सयाजिरायां** पहिली अर्पियेली,
चरणीं तुमच्या दुजि आवृत्ती ही अजि सादर केली,
मान्य करा तिजला, । द्या हो उत्तेजन मजला.

**कान्होबा.**

# विद्वज्जनप्रार्थना.

### आर्या.

रंग मयूरसम नसे, तरि काकें पंख काय टाकावे !
गान मयूरसम न ये, अल्प रितीं कां तरी न म्यां गावें? १
बाळ हुशार नसे, बहु परि बोलां बोबड्यां न तें सोडी;
विद्वज्जनहो, माझ्या अल्पमतीची तशीच घ्या गोडी. २
जरि धांवाया ये ना, तरि का भ्यावें मुळींच चालाया ?
जैसें तैसें रचितों, वाचा साद्यंत, आर्य, काव्या या. ३
'भक्तिसुधा' ती रचिली ईश–परायण–मनो–गतीनें मीं,
कथिल्या 'विलापलहरी' जातां भार्या अखंड–सुख–धामीं; ४
आतां गातों, कैसें स्त्रीपुरुषांचें परस्परांलागीं
साह्य असोनि, परस्पर घ्यावें ओझें स्वयें शिरोभागीं. ५

### श्लोक.

**कान्होबा, रणछोडदास**-सुत मीं **कीर्तीकरां**च्या कुळीं
जन्मा येउनि, सार्थक स्वतनुचें केलें न वाटे मुळीं;
आहे एकचि आस या मनिं अशी–काव्यें रचोनी स्वयें,
द्यावीं म्यां विनयें सदा कविजनां अर्पोनि हस्तद्वयें. ६

---

१ "मोरोपंत कविवर्य यांच्या सारख्या **आर्या** रचितां येत नाहींत, म्हणून—"असा अर्थ.

# प्रस्तावना.

हें काव्य ख्रिस्तलोकनिवासी आंग्ल–राजकवि **टेनिसन** यांच्या **प्रिन्सेस** नामक काव्याची अनुकृति आहे, भाषांतर नव्हे. रघुनाथ पंडितानें केलेलें सुप्रसिद्ध नळोपाख्यान ही नैषध काव्याची याच प्रकारची अनुकृति आहे. **प्रिन्सेस** काव्यांतून साधतील तशीं, व योग्य वाटलीं तशीं, अनेक वाक्यें **इंदिरा** काव्यांत मराठी भाषेंत पहिल्या आवृत्तींत पद्यरूपानें घातलीं होतीं; शिवाय माझेही कांहीं अल्प विचार समाविष्ट केले होते. रघुनाथ पंडिताचीही पद्धत अशीच दिसते. पहिली आवृत्ति दोन हजार प्रतींची होती; पैकीं बाराशें प्रती, पहिली आवृत्ति प्रसिद्ध होतांच, विकल्या. बाकीच्या प्रती ठाणें, पुणें येथील लहान मोठ्या शाळांतील मुलांमुलींस फुकट वांटल्या. पहिल्या आवृत्तींत भाषेचे, व्याकरणाचे, छंदांचे, छापण्याचे वगैरे जे अनेक दोष होते, ते काढून टाकण्याचा यत्न या आवृत्तींत विशेष केला आहे.

पहिल्या आवृत्तींत जे दोष होते ते माझ्या खालीं दाखल केलेल्या तीन परम सन्माननीय मित्रांकडून कसे कळून आले, ते येथें आभारपूर्वक सांगतोंः—

(१) राजमान्य रा० **विष्णु मोरेश्वर महाजनी** एम्. ए. यांनीं वेळोवेळीं इंदिरेच्या पांच सर्गांचें परीक्षण करून, वऱ्हाडांतील **वैदर्भ** वर्तमानपत्रांत एकंदर नऊ लेख प्रसिद्ध केले.*

---

* वैदर्भाचे अंक ता० ४ अक्टोबर १८८४ पासून, ता० ९ मे १८८५ पर्यंत पहा.

विष्णुपंतांच्या मार्मिक लेखांचा इंदिरा काव्याच्या दुसऱ्या आवृत्तीला विशेष तेज आणण्याचे कामीं पुष्कळ उपयोग झाला. त्यांच्या मार्मिक लेखांमुळें तेज आलेलीं जीं नवीं पद्यें या दुसऱ्या आवृत्तींत मीं घातलीं आहेत, त्यांचें श्रेय त्यांसच दिलें पाहिजे. नवीन पद्यांत प्रसंगीं त्यांचेच शब्द माझ्या अल्पमतीनें मीं योजिले आहेत.

(२) मासिक विविधज्ञानविस्तारांत "पुस्तकपरीक्षा" या सदराखालीं इंदिरा काव्याच्या संबंधानें सतराव्या पुस्तकांत ( एप्रिलपासून जुलै १८८५ अखेर ) जे निनांवी लेख प्रसिद्ध झाले, ते माझे कै० वा० मित्र रा० रा० वामन दाजी ओक यांचे होते, हें मला ते लेख प्रसिद्ध होत असतांनाच कळून आलें होतें. त्यांच्या परीक्षणानें माझ्या या दुसऱ्या आवृत्तीला बराच फायदा झाला आहे.

(३) इंदिरेच्या पहिल्या आवृत्तींत संगीत पद्यें घातलीं होतीं, त्यांत जेथें जेथें संगीतशास्त्राचा अतिक्रम माझेकडून झाला होता, तो माझे गायनकलापटु मित्र गोपाळराव विनायक खारकर यांनीं इंदिरेची पहिली आवृत्ति प्रसिद्ध होतांच, पहिल्यानेंच माझे नजरेस आणला, व नव्या चालीवर तीं तीं पद्यें गाण्याचा मार्गही दाखविला; त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

पहिल्या आवृत्तींत ज्या साक्या मीं घातल्या होत्या, त्या गायनशुद्ध दिसल्या नाहींत; ह्मणून त्या सगळ्या साक्या धारवाडकर गायनशिक्षक रामचंद्र सखाम बापट यांजबरोबर गाऊन गायन-शुद्ध केल्या आहेत. इंदिरा छापत असतांना रत्नागिरीस या वर्षाच्या आरंभापासून आजपर्यंत पुढील तीन गवयांच्या समोर

अथवा बरोबर इंदिरेंतील संगीत पद्यें तालसुरावर मीं गाऊन बसविलीं आहेत, त्या गवयांचीं नांवें येणेंप्रमाणें:– (१) गोपालसिंग बालाराम. हे मध्यहिंदुस्थानांतील माळवा प्रांतांतील रजपूत रहिवासी. यांच्या बरोबर यांचे दोन मुलगे भाऊसिंग, उमर वर्षें १६ आणि नानासिंग, उमर वर्षें १३ हे गावयास असतात. नानाचा आवाज कोमळ व फारच गोड आहे. गोपालसिंगाचे "वस्ताद" हुसेनखान हे होत; हल्लीं त्यांची उमर वर्षें ७० आहे. ते माळव्यांतील जावरा संस्थानाचे अधिपती नबाब महंमद इस्मायेलखान बाहादूर फिरोझजंग यांच्या तैनातींत आहेत, व त्यांचा गाण्याचा क्रम अझून चालू आहे. गोपालसिंगाची गाण्याची तऱ्हा मर्दानी. जावरा संस्थानास "गुलशनाबाद" असेंही नांव आहे. (२) रामदुर्गचे सखाराम बळवंतराव केतकर. बापलेंक उभयतां गाण्यांत निष्णात आहेत. बळवंतराव केतकर यांनीं आज पंधरा वर्षें "खरज" सुराचा अभ्यास करून सर्व उत्तर दक्षिण हिंदुस्थानभर–बनारसपासून तों म्हैसूरपर्यंत–आपलें नांव गाजविलें आहे; इतकेंच नाहीं, तर गायनकलेला नवें स्वरूप दिलें आहे. "खरज" सुर सहसा साध्य नाहीं. ज्या गवयानें हा सूर साध्य करून घेतला, तो सामान्य गवई नव्हे. बळवंतरावांची माझी ओळख नाहीं; ही माहिती माझे मित्र रावबाहादूर कृष्णाजी बल्लाळ देवल यांजपासून मिळाली; ती येथें देतों. बळवंतरावांच्या चिरंजिवांसमोर किंवा बरोबर ह्मणा, इंदिरेंतील बहुतेक संगीत पद्यें गाइलीं आहेत. (३) सांवतवाडीकर बीन वाजविणारे प्रसिद्ध लक्ष्मणराव पोंक्षे–ऊर्फ दांडेकर–यांच्याही समोर इंदिरेंतील संगीत पद्यें मीं गाइलीं आहेत. होतां होईल तितका यत्न करून संगीत पद्यें गायनशुद्ध केलीं आहेत. मुख्य श्रेय गोपाळराव खारकरांचें. शब्द माझे, विचार

माझें; त्यांची गायनपर योजना ठरविणें काम गोपाळरावांचें. चूक असेल तर माझी. गायन मला अत्यंत प्रिय आहे. गवयांबरोबर गाऊं शकतों, पण कोठें कोठें ढांसळतों—असो. प्रसंगीं लिमये बुवांनींही मजबरोबर गाऊन, इतर संगीत पद्यें शुद्ध केलीं आहेत. उत्तर हिंदुस्थानांतला उत्तम गवईही आज माझ्या तैनातींत आहे, इंदिरेंतील पद्यें रागरागिणींवर माझ्या बरोबर गाऊन मला दाखवीत आहे.

शेवटीं—माझ्या मित्रवर्गांत मुकुटमणी वे० शा० संपन्न **राजाराम रामकृष्ण शास्त्री भागवत** यांजकडून ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्यांत जें साह्य झालें आहे, त्याबद्दल त्यांचे आभार मानीन तितके थोडेच.

वटपूर्णिमा, शके १८२३.<br>ता. २ जून इ. स. १९०१. } **कान्होबा रणछोडदास कीर्तिकर.**

# शुद्धिपत्र.

Page 10; साकी ४४, for नांहीं read नाहीं.

Page 43; दिंडी १०४, for जाला read जालां ?

Page 44; साकी १०६, for फडफड read फडफडफड.

Page 53; पद १६०, for रागिणी कानडा read राग कानडा.

Page 95; श्लोक २९, "लगाम" याच्यापुढें , (comma) पाहिजे.

Page 137; श्लोक ५९, "जास्वन" बद्दल "गुलछबु."

Page 145 to Page 154; पद्यांचे अंक १०५ पासून १५८, अनुक्रमें समजावे.

Page 156; दिंडी १०, "वसुमती" असें वाचावें.

Page 159; श्लोक ३०, enter " (inverted comma) after second line, and a *dash*.

Page 161; दिंडी ४०, enter ; (semi-colon) after 3rd line thus--ठायीं;

Page 161; line 4 should be read पडुनि लोळे तें इंद्रिरेसुपायीं.

Page 161; साकी ४१, is there अनुस्वार on पडलेली ? if so, remove; it should be पडलेली.

Page 171; in साकी ९६, in 2nd line, instead of नाणी तें, use नाणी ते; remove the अनुस्वार from तें.

Page 172; श्लोक ९७, for धुवीन say धूवीन.
For दिसे read दिसें.

# इंदिरा.

## मंगलाचरण.

पद. राग केसुरि. ताल—त्रिवट, पंजाबी.
अंजनिसुत हनुमंत.—या चालीवर.

परमवंद्य भगवंताऽनंता धीदात्या, मज मतिमंदा । कवन कराया निजवर द्यावा रसिक करावें मम छंदा ॥ ध्रु० ॥
प्राकृतभाषासरोवरींच्या शोधुन सुंदर अरविंदां, । मधुपासम अति मधुर करावें संचित काव्य-सुमकरंदा ॥ १ ॥; परमवंद्य भग० ॥
स्त्रीपुरुषांनीं नित्य परस्पर कथितों केवीं सुखकंदा । वाढवुनी, निज प्रेमळ यत्नें सेवावें गृहिं स्वानंदा ॥ २ ॥; परमवंद्य भगवंता० ॥
इह संसारीं नर-समुदायें साधावें त्या स्त्री-वृंदा, । स्त्रीपुरुषांचें ऐक्य असावें, गातों प्रभु तव पदिं वंदा ॥ ३ ॥; परमवंद्य भगवंता० ॥

# संकेतनामक सर्ग पहिला.

## दिंड्या.

आर्यभूमीच्या उत्तर प्रदेशीं
क्षत्रियांच्या कुळिं दिव्य सूर्यवंशीं
चंद्रकेतू जन्मला राजपुत्र,
तोचि कवनीं या धरिल करीं सूत्र. १
रूप सुंदर, सुकुमार तो कुमार,
शिरीं केशांचा कुरळ दाट भार,
नेत्र चंचळ बहु रम्य तेजदार,
स्वयें ज्ञानी गुणि मनाचा उदार. २
पिता त्याचा अति चतुर सद्विचारी;
माय साध्वी सकळिकां सौख्यकारी;
बाळ असतां तो, मातृकाळ झाला;
अर्भकाचा प्रतिपाळ नृपें केला. ३
राजतनयें माते न देखियेलें,
मातृवात्सल्या नाहिं जाणियेलें;
तयें बाळपणीं भोगिलें वियोगा,
माय अंतरतां मुके बालभोगां. ४
पिता होता नृप स्वजनहितीं दक्ष,
प्रजापालनिं जो पुरवि पूर्ण लक्ष,
थोर न्यायें संतोषवी जनाला,
नाम सत्यध्वज शोभलें तयाला. ५

राजपुत्राचे दोन मित्र साचे,
खिलाडू ते प्रिय बहूतां दिसांचे,
एक सौंगडि कमलाक्षनामधारी;
दुज्या शशिवदना-वरी प्रेम भारी. ६

श्लोक.

होती दक्षिण देशिं एक तनया राया गजेंद्राप्रती,
नामें शोभत इंदिरा बहुगुणी, सौंदर्यराशी अती;
गेली टाकुन माय बाळपणिं; ती कन्या प्रिया कोमला
तातें वाढविली, सुमाय-ममता ठावी न कांहीं तिला. ७
राजा थोर कुलीन तो, निजजनीं होता प्रिय प्राणसा;
तैशी थोर कुलीनही नृपसुता ती वाढली राजसा;
विद्या ती चवदाहि जाणत असे, चौसष्ट तैशा कला;
बाल्यापासुनि चंद्रकेतु वर हा होता तिला निश्चिला. ८
प्रेमा ठेवुनियां तिच्या वरि, तयें भार्या तिला मानिलें,
सौख्या पावुनियां तिच्या सुमननें, रूपा गुणां वानिलें;
अंतर्यामिं सुमूर्त्ति कोंदुन तिची गेली तयाच्या पुरीं;
देखीलें कधिं नाहिं तैं तिज, परी पूजी वसोनी दुरी. ९

परि नृपतनयेच्या मानसीं काय हेतू
नृपसुत कधिं कांहीं बाळगीनाच किंतू;
तिळभर तरि ना त्या वाटली भ्रांति चित्तीं,
उपवर वधु वाटे प्राप्त होईल अंतीं. १०

होतां यौवन प्राप्त तें स्वतनया, एके दिनीं त्या नृपें
जासूदां करिं रत्नहार वसनें देवोनि सोनें रुपें

मोत्यांचे बहु रम्य हार सुफलें नानापरीचीं बरीं,
त्यांतें पाठविलें गृहीं नवरिच्या आणावया सुंदरी. ११

गेले घेउन दक्षिणेस वसनें तैसे अलंकारही;
ग्रामा हेर तया बघोन रमले, ठेले नृपाच्या गृहीं;
रत्नें मौक्तिक दिव्य हार वसनें रायापुढें ठेवुनी,
कन्या मागितली निरोप अपुल्या राजोक्तिचा देवुनी. १२

सत्कारें बहु हर्षले सुनगरीं राहोन जासूद ते,
सौजन्यें मृदु भाषणें नरपती त्यां तोषवी स्वागतें;
शेला भेट दिली परी न कुमरी हेरांसवें धाडिली,
वर्षांची बहु इष्ट सोयरिक ती ऐशी क्षणीं तोडिली. १३

आले तें परतोन सेवक घरीं, उद्विग्न रायाप्रती
वृत्तातें कथुनी ,तदा कळविती भावी सुनेची स्थिती:—
"कन्यातात ह्मणे—'मुळींच न चले बालेपुढें आमुचें;
केला बाळपणीं करार, परि ना संबंध तीतें रुचे; १४

कल्पांतीं न वरीं कुणाहि पुरुषा, बाळा असें ती वदे,
मानीना गणिना कुणाहि, कसल्या बोधास ना कान दे'."
वृत्ता या विपरीत ऐकुनि सभा कुंठीत झाली सवें,
आशेनें भरल्या मनीं नृपतिच्या उद्विग्नता उद्भवे. १५

राजा खेद करी, विचार न सुचे, पुत्रापरी नोवरी
आणावी कुठुनी, कधीं, कशि मिळे ही काळजी अंतरीं;
आधीं देउनियां रुकार मग ती नाकारितो कन्यका,
बाळा ऐकत नाहिं तातवचना, राजा असा धन्य का? १६

"कशी रायें केली"–स्फुरत नृप सत्यध्वज वदे,
"अमर्यादा माझी कुमरि-खुळ-नादें बहुमदें?
करोनी संग्रामा धरुन नवरी आणिन घरीं,
सुताच्या हातीं मी करिन वधुला, क्षत्रिय तरी." १७

दिंडी.

राजपुत्रें ऐकिला वधुनिरोप;
दुःख झालें बहु, चढे मनीं कोप,
ह्मणे स्वमनीं "जिंकीन नोवरी ती,
मला वरणें नाहींच अन्यरीती." १८

श्लोक.

ाहोनी निजतात-मानस-गती ज्ञात्या कुमारें अशी,
ली युक्ति विचार पूर्ण मथुनी ऐका सुपुत्रें कशी;
्यासन्मुख येउनी सुविनयें ठेला उभा लीनसा,
ाले "तात! कशा विचारिं बुजतां? कां खिन्न हो होतसां? १९

जरी आज्ञा होई, गमन करितों दक्षिणपथा;
न जाणों सौंदर्यादिक असति वृत्तांतचि वृथा;
वरावी म्यां कैशी मुळिंच दिठल्यावीण तरुणी?
मला ऐशी मिथ्या रुचत मुळिं ना लग्नसरणी. २०

बघोनी ती मातें जरि न रुचली राजतनया,
करावें म्यां काई? तरिंच वधु नेमस्त बघुं या;
जया जैशी व्हावी, मन मिळतशी शोधुन तयें
वरावी हो भार्या, तरिच जुगती दोन हृदयें. २१

जाऊं द्यावें त्वरित मजला दिव्य ताता दयाळा!
शोधोनी तत्सदनिं तिजला पाहतों लोकपाळा!
पाहोनीयां रुचलि, तर ती आणितों राजबाळा,
जिंकोनी मी वरिन तिजला साधुनी योग्य वेळा. २२

युद्धीं जें जें जित मिळतसे, आपणा क्षत्रियांनां
भोगाया तें प्रियतर असे, पूर्ण हें जाणतांनां?
द्या हो आतां त्वरित मजला तात तुह्मी रुकारा,
जातों व्याया करवुनि सवें आपुल्या अंगिकारा. २३

मी क्षत्रियांच्या कुळिं पुत्र साचा
योजून युक्ती, मम मानसाचा
हेतू प्रयत्नें पुरवीन ताता,
होईल आज्ञा जरि शीघ्र आतां". २४

उभा होता पाठीं शशिवदन, तो राजतनया
ह्मणे—"संगें नेई मज परम मित्रा! करिं दया;
तुझ्या वीणें वाटे युगसम सख्या एक चिपडी,
ममायुष्या का मी करुं, वद कशी जाइल घडी".२५

तैं मित्र दूजा कमलाक्ष बोले—
"माझी स्वसा सन्निध राजबाले
आहे; मला ने, तिथ भेट घेऊं;
साह्यें तिच्या हें तडि काम नेऊं". २६

पद. राग धनाश्री.—ताल एका.

(क्षणभंगुर संसार—या चालीवर.)

"मजला ने आपुल्या संगें। मित्रा ने आपुल्या संगें॥ ध्रु०॥

तिघेहि आपण चित्तीं एकच, भिन्न जरी अंगें; १ मित्रा०
असे प्रवासीं कोणि सहाय्या, विघ्न तरी भंगे; २ मित्रा०
लोह न वापरतां जैसें, तुजवीण तसा जंगें; ३ मित्रा०
आह्मि न सोडूं तुज, यमुना जशि सोडी ना गंगे".४ मित्रा० २७

श्लोक.

ह्मणे राय तो दीर्घ गर्जोनि वाणी,
वदे शब्द कीं गर्जतें अब्धि पाणी:–
"नका जाउं कोणी, लढोनी सुयुद्धीं
करीतों स्नुषेची स्वयें मीच शुद्धी". २८

दिंडी.

लाल झाले तन्नेत्र; तन्मुखाचा
दिसे वर्ण जणूं अग्नि मूर्त्त साचा;
राजवाणी ती अंतरालिं गेली,
विसर्जन मग नृपवरें सभा केली. २९

राजपुत्रें नृपवचन आयकीलें,
परी स्वविचारां नाहिं त्यागियेलें;
सभा आटपतां उपवनांत गेला,
भावि भार्येचा बहु विचार केला. ३०

श्लोक.

नेलें तेथ सुरम्य चित्र वधुचें त्या राजपुत्रें सवें,
बैसे ठेवुनि आपुल्या पुढतिं, त्या बोले बहू आर्जवें:–

"साध्वी कां मजला न तूं वरिशि गे! मोहाब्धि हे इंदिरे!
कां हे वागविशी विचार, मजला संसार जैं अंतरे ? ३१
वारा मंजुळ वाहतो उपवनीं, माधुर्य जैं तैं वसे,
कां गे राजसुते ! मनीं, तव मुखीं, माधुर्य तैसें नसे ?"
ऐसें भाषण आपणाशिं करि जों वध्वार्त्तिनें जिंकिला,
"ये ये दक्षिणपंथिं ये, जय मिळे !" व्योमीं ध्वनी ऐकिला. ३२
व्योमींचा ध्वनि ऐकुनी, स्मित बहू, न्याहाळितो अंबरा,
मेघाच्छादित चंद्रकोर बघुनी, बोले सुधाराधरा:—
"हे मेघा, जगजीवनाऽमृतमया ! हे चंद्रम्या शीतला !
द्या शांती, मम आर्त्त मानसिं हृदीं मोहाग्नि हो चेतला." ३३

**दिंडी.**

गृहीं आला तेथोनि राजपुत्र,
बलावूनी आपणापाशिं मित्र,
वृत्त कथिलें, संकेत मानसाचा;
ह्मणे:—"दावा अजि मित्रभाव साचा". ३४

पद. ठुंबरी, राग सिंदुरा,—ताल त्रिवट.
(निकनजर मोरा मन—या चालीवर.)

अजि इतर नाहिं इष्ट मम मनीं । गड्यांनो,
पाहूं या नृपकन्या; ॥
योग्य जरि ती दिसली तरि हरूं । हो, तियेला ॥ ध्रु० ॥
वधू सतत चित्तिं घोळे । दिनराती । मज कांहीं
चैन पडत मुळिंच नाहीं, । तळमळतों मी; ।
विनति एवढि माझी परिसुनि । मजसंगें या. ॥ १ ॥
अजि इतर नाहिं०" ३५

## श्लोक.

ऐसें योजुनि, पूर्ण चंद्र नभिं तो झाल्या अर्धी सौंगडी
आनंदें भरले तिघे उतरले, लावोनि बुर्जा शिडी;
गेले गांवकुसाचिया पलिकडे, भीती परी मानसीं,
हाहाकार पडोनि राजगृहिं कीं जासूद ये पाठिसीं. ३६
कड्याच्या बाजूनें, हरित शिखरीं ज्या वन सजे;
नद्या, नाले, जैं कीं स्थल सुजलनृत्यें गजबजे;
दऱ्या, खोऱ्या, शेतें उगवति जिथें नूतन उतें;
असे उल्लंघीले बिकट पथ यत्नें नृपसुतें. ३७

बुर्जा किल्लयां देखतां उच्च उच्चां,
राजग्रामा पातले दक्षिणेच्या;
शोधोनीयां राजमंदीरमार्ग,
रायापाशीं ठाकला तो त्रिवर्ग. ३८
शब्दीं केले राजियानें प्रसन्न;
देवोनीयां भोजना मिष्ट अन्न,
केलें त्यांचें आदरातिथ्य पूर्ण,
लग्नाची ना गोष्ट; ती झालि जीर्ण. ३९

साक्या. राग जोगी—ताल एका.

चवथ्या दिवशीं युवराजानें लग्नाचा अनुवाद
बहुयुक्तीनें केला, ज्याचा रात्रंदिन त्या नाद;
बोले "वद राया। होइ न कां ती मम जाया ? ४०
बहुवर्षांच्या जोडाचा कां करिते कुमरि विजोड;
बहु काळाचा जडला प्रेमा कां घडवी घडमोड ?
सांगा अजि राया। होइ न कां ती मम जाया ?" ४१

### श्लोक.

बोले राय गजेंद्र, "सत्य वदतां, संकल्प केला असे,
बाळा वाढविली स्वतंत्र, पण हो तो मान्य मुग्धे नसे;
कन्या मागतसां, रितीं गमत या, सन्मान राखीतसां;
सांगा काय करूं परी, कवण त्या योजूं उपाया, कसा? ४२
जन्मा आलें कुळिं अमुचिया रत्न हें दिव्य थोर,
त्यापासोनी गृहिं अवदसा पातलीसे अघोर;
दुर्दैवानें सुखद जननी माउली, माझि पत्नी
गेली बाळे त्यजुनि; दुहिता वाढवीली स्वयत्नीं. ४३

### साकी.

बाल्यापासुनि या तनयेनें सुख नाहीं मज दिधलें,
भलभलते मनिं विचार आणुनि विरसचि जीवन केलें;
ऐसा कर्मांचा। घडला खेळ गृहीं साचा. ४४
वाढत होती जननीविरहित तनया जैं, तिजलागीं
ममताविरहित शिक्षण मिळलें, तैं ती झालि विरागी,
आतां मज न कळे। उघडूं केविं तिचे डोळे. ४५

अंजनीगीत. राग माढ—ताल एका.

लग्नाचा स्यां करार केला,
तो तिजलागीं अमान्य झाला;
काय करावें या तनयेला,
न कळे मज आतां. ४६
बालपणीं आवडती बालें,
तोषविती मृदु प्रेमळ बोलें;

दुःख जरी कां त्यांतें झालें,
चुटका मनिं लागे. ४७
कष्ट करावे सौख्यालागीं,
भार मुलांचा स्वशिरोभागीं
पितरीं घ्यावा, परि तिं अभागी,
बालक जरि बिघडे. ४८
वाढत बाळें कधिं कधिं फांटा
फुटुनी धरिती भलत्या वाटा,
पितरां जीवीं लागे कांटा
दुहितेपरि माझ्या. ४९

श्लोक.

प्रचंड वाता धरणें न हातीं,
प्रदीप्त उल्का अडणें न पातीं,
तशी सुतेच्या स्थिति मानसाची
घडे विवाहा प्रतिकूळ साची. ५०
बहुत मजला लज्जा वाटे, करूं परि काय तें ?
सुचत मुळिं ना कांहीं, बाळे तिचें खुळ शोभतें;
सकळ जगता जिंकोनीयां धरीन करीं स्वयें,
परि न दुहिते ऐशा हातीं मुळीं धरितांचि ये. ५१
वरुनि तुजला आधीं आर्या, जरी मग ही कृती
घडलि असती, होती कैशी तुझी न कळे स्थिती;
मज गमतसे जें झालें, तें बरें, जरि दुःखद;
तुज मिळुनि हीं कन्या होई कसें सुख बा, वद? ५२

## दिंडी.

काय तुजसम नृपसुता कुण्या काळीं
वाण नवरीची पडे अन्य कूळीं?
अरे माझी ती सुता तुझ्या भागीं
पडे जरि ना, तिज गणीं तरि अभागी. ५३

## श्लोक.

कमलजा कमलाक्ष-सहोदरी,
शशिकला विधवा तशि दूसरी,
प्रिय सुमायसमा तिज रक्षिती,
जशि लतांप्रति रक्षितसे क्षिती. ५४
गणेशापदींच्या जणूं रिद्धिसिद्धी,
जयां योजिलें म्यां सुतेची सुबुद्धी
मती वाढवाया यथायोग्य रीती,
सुते गोष्टि सांगोनि त्या चाळवीती. ५५
समवयी, गुणि, प्रौढ, गुरुद्वय,
बहु सदा तनुजा गणि जें प्रिय;
निशिदिनीं तनये स्वसमागमें
भ्रमवि तें अपुल्या मतिच्या भ्रमें. ५६
रविस केतु जसा नभिं लोपवी,
शशिस राहुकळा थरकांपवी,
गतधवा ग्रहणापरि लागती;
ग्रह जणूं सम पुत्रिस ग्रासिती. ५७
पतिरहित अशा या पंडिता राजबाळे
शिकविति अवघे हे दुर्मदें वेडचाळे;





अति मन कंवळें तैं नाशिलें कन्यकेचें,
पढविति जगिं या कीं धिक् जिणें त्या स्त्रियांचें. ५८

मुलिस जननीतुल्या झाल्या प्रिया गतभर्तृका;
दवडिलि न बा त्यांहीं संधी सुता शिकतां फुका;
वदति वनिता–लोक ध्वांतीं अशेषहि लोपला;
परिसुनि सदा ऐशी वाणी, तिचा मनु कोपला. ५९

### साक्या.

बाल्यापासुनि तिला शशिकला शिक्षक मुख्यचि होती,
दीडवर्ष जाहलें कमलजा आली गुरु दुसरी ती,
विधवा होवोनी । बाळक कटिवरि वाहोनी. ६०
स्त्रि–उन्नतिपर काव्यें लिहविलीं तयिं मम कन्येकरवीं,
पुरुषमत्सरी वाक्यें योजिलीं, मज गमलीं ना बरवीं;
मोठा घोंटाळा । मंदिरिं माझ्या करि बाळा. ६१

### श्लोक.

ह्मणाली दिनीं एक मातें सुता ती–
'पित्या, धन्य व्हा, स्वीकरा कार्य हातीं,
स्त्रियांचें हरा दास्य, त्यांलागिं दावा
असा मार्ग कीं भोगिती त्या स्वजीवा. ६२

रम्या कांचनपूर नाम नगरी जी उत्तरेला वसे,
तेथें जाउनि, पूर्ण निश्चय मनीं केला पित्या मी असे;
शाळा स्त्र्युन्नतिकारणें निजमती स्थापीन, आशाभरें
स्त्रीवृंदा शिकवीन केविं असुचें तें दास्य सारें हरे.' ६३

ऐशी स्थिती बघुनियां तनया-मनाची
लागे बहू मजशिं काळजि नित्य साची,

होऊं नये स्वगृहिं त्या कलहास मूळ,
कन्येप्रती दिधलि म्यां नगरी समूळ. ६४
वसे तेथें शाळा; सकळ तयिं नारी जमुनियां
सुतेच्या आज्ञेनें, गणुनि तिजलागीं बहु प्रिया,
सुविद्याभांडारीं विविध-विषय-ज्ञान वरिती,
हरावें दास्या तें स्वमनिं अभिमानासि धरिती. ६५
स्वबंधू स्वप्राणासम जरि सुते सर्वहि रिती,
तरी स्त्रीग्रामीं त्यां तिळभरहि देई स्थळ न ती;
मिळे तेथें कैंचा इतर पुरुषां ठाव नगरीं;
स्त्रियांवीणें बाळा कवण इतरीं संग न करी. ६६

श्लोक (तोटक छंद).

वरण्या तुज देइन मी तनया,
गुंतलों वचना, मनिं जाचित या;
परि काय करूं? मजला न कळे,
कशि वृत्ति विवाहिं मुलीचि वळे. ६७
तुजला वरिल्या सुखि होइल ती;
गृहिणी नसल्या अबले न गती;
तरि सत्वर जा! वसते जिथ ती,
तिजला हरिं तूं सुचल्या सुरितीं. ६८

साकी.

तुझ्या पित्याच्या राज्यशिवारीं
वसविलि कांचनपूरी,
स्त्रीजनवैभव वाढविण्याला
झाली ती नरवैरी;
शोभे हें न तिला। हर! जा! मुक्तमार्ग तुजला. ६९

श्लोक.

बकुळिचें फुल तें सुकलें जरी,
मधुरता तयिंची उरते परी;
मुल कुलीन तसें चुकलें तरी,
स्वसुकुलांकुर राहति अंतरीं. ७०

आज्ञापत्र लिहून देइं तुज घे, जाई सुतेच्या पुरीं;
होई साध्य तुला जरी हि तनया, सौख्यें तरी तूं वरीं;
वाटे ती मजला असाध्य अबला, स्वच्छंद, हट्टी असे;
केले यत्न किती; मिळे अजि तुला, आशा मला ही नसे." ७१

परिसुनि नृपयाची उक्ति ऐशी अभद्र,
बहु नृपसुत कोपें क्षोभला, जेविं रुद्र;
सकल नगरिमाजी धुंडुनी अश्व तीन,
त्वरित नृपकुमारें मेळवीले कुलीन. ७२

अश्वांपाठीं घालुनी खोगिरांला
योजीयेला अश्व तैं एककाला;
थंड्या पारीं रात्र होतां निघाले,
सांगूं काई त्यां किती क्लेश झाले! ७३

प्रिय सहचर मार्गीं चालतां त्या कुमारा
विगलित-नृपपुत्रा देति धैर्यें इषारा,
रमवित निज मित्रा कांचनासन्न आले,
ह्मणति मनिं करावें काय त्या राजबाले. ७४

ज्यां स्वार्थ नाहीं, पर ना, न आप,
ते मित्र दोघे शमवीत ताप,

वाटेंत जातां वदती स्वमित्रा
हिर्मूसल्या कोपित राजपुत्रा. ७५

**पद. राग परज,—ताल त्रिवट.**

(मग चलत का नं कर अटकी—या चालीवर.)

"कशा घोर छंद हा धरिशी; । काय मिळेना इतर स्थळीं वधू, । श्रम अपार निकरें करिशी. ॥ ध्रु० ॥
रूप असें का लागुन गेलें; । श्रम अपार निकरें० ॥ १ ॥
राजगृहीं अशि वाण किं पडली, । श्रम अपार० ॥ २ ॥
कुठवरि खुळिच्या नादीं पडण्या । श्रम अपार० ॥ ३ ॥
जिथ जाशिल तिथ चलुं, परि वाटे । श्रम अपार फुका करिशी ॥ ४ ॥ कशा घोर छंद हा धरिशी. ७६

**श्लोक.**

गंगोद्भवापासुन सेतुबंध-
रामेश्वरातें फिरण्यास सिद्ध
आहों; परी तूं श्रम हे कशाला
घेशी? फुका घालविशी वयाला." ७७
बोले ऐका उत्तरा चंद्रकेतु—
"बोलाचा या जाणतों सर्व हेतु;
केली आहे मी परी हो प्रतिज्ञा,
मोडीतां ती हास्य होईल सुज्ञां. ७८
जाणां ना का क्षत्रियांचें जिणें तें
बोले तैं ना चालल्या व्यर्थ जातें?
यासाठीं हो जाउनी स्त्रीपुराला
मित्रांनो मी पूरवीतों पणाला." ७९

## साकी

ऐसें बोलत त्रिकूट कांचन नगरी संनिध पावे,
विचार करितें कवण्या रीतीं नगरीमाजि शिरावें;
ह्मणतें साह्य हवें, । कुणाचें न कळे मागावें. ८०

## श्लोक.

बहुत नगरि शोभे रम्य तीरीं नदीच्या,
झुळ झुळ झुळ वाहे नीर मध्यें जियेच्या;
मृदु जलरव देई तोष कर्णेंद्रियातें,
सुखकर दिसतो तो देश सारा सभोंतें. ८१

ग्रामापाशीं बघुनि त्रिकुटें शांतसें एक खेडें,
विश्रांतीला तिथ उभविले आपुले श्रांत घोडे;
गेले तीन्ही बहुत थकुनी दिव्य ते वीर साचे,
उल्हासानें उतरति तिघे तैं गृहीं पाटलाचे. ८२

सामोरा तो नम्र पाटील आला;
हास्यें बोलें मिष्ट त्या व्याकुळांला
खायाप्याया अन्नपाणी स्वहस्तें
देवोनीयां तोषवी पूर्ण हेतें. ८३

पाटील होता नकल्या स्वभावें,
ऐकोनि कीं बोल जनें रमावें;
विद्या नसे त्यास मुळींच कांहीं,
संतोषवी तो अपुल्या गुणांहीं. ८४

भोजनोत्तर तिघे मग तांबुला
सेवुनी निघति घेउनि पाटला;

राजपुत्र कथि त्या घडल्यापरी
केविं येइ तिथ शोधित नोवरी. ८५.
काय पाटिल तया परिसा वदे—
"गाढ ती नृपसुता भरली मदें;
पूर्ण मी तिज अहो! वळखीतसें;
स्वैर, थोर अभिमानि मला दिसे. ८६.

सुता माझी जाया नृपकुमरिला सेविति सदा;
कधीं त्यांचा झाला तिजकरिं असन्मान न कदा;
नव्या येती बाला दुरुनि जयिं शाळेंत शिरण्या,
गृहीं या आधीं त्या उतरति श्रमांलागिं हरण्या. ८७

तयांसंगतीं माझि भार्या, सुता ती
क्रमानुक्रमें नित्य नेमेंचि जाती;
वहू सांगती गोष्टि रूपागुणाच्या
सुतेच्या श्रमाच्या, भ्रमाच्या, क्रमाच्या. ८८

दिंडी.

विलक्षण ही किति असे राजकन्या,
नरा मांजरिच्या कुतरिच्या अधन्या.
राहुं देईना नगरिं आपुल्या ती!
तुह्मां ठाव मिळे तेथ कवण रीती[1]? ८९

श्लोक. तोटक छंद[2].

'अबलामय हें जग जाहलिया
नर सोडुन जातिल ते दुनिया'—

१ ही पाटलाची शुद्ध थट्टा, हें पुढील पद्य १०२ इत्यादि रचनेवरून दिसून येईलच.

२ हे श्लोक तालसुरावर गातां येतात (पंजावी ठुंवरी, राग केसुरी, ताल त्रिवट.)



वदते नृपजा वचना अशिया;
वद काय मिळे तिज हें घडल्या. ९०

तसलें घडल्या, जिकडे तिकडे
गृहसौख्य सरे पवुनी तुकडे;
मग होइल वंशसुवृद्धि कशी ?
मति ही विपरीत विनाशकशी. ९१

नगरीवरि ये परचक्र जरी,
सहबाल स्त्रिया पळतील दुरी;
अशिया अबलांकरवीं पुरती
कशि उन्नति स्त्रीजनिं ती घडती ? ९२

साक्या.

ऐसें बोलत असतां पाटिल, राजतनयमनिं आला
विचार कीं स्त्रीवेष धरोनी, पाहवि नगरीं बाला.
बोले "पाटिलजी । माझें कार्य करा आजी". ९३

साह्य करा अजि सजवा आह्मां, स्त्रीवसनें लेवोनी,
जाउनि गांठूं राजबाळिला, येऊं तिज घेवोनी;
बुद्धी पुरुषांची । दावूं बलवत्तर साची. ९४

अमुच्या घरिं नाटकें तमाशे होत होति ते जेव्हां,
स्त्रीवेषी अह्मि तिथे नटुनियां नाचत होतों तेव्हां;
जाणूं पूर्णपणें । स्त्रीपात्राला शोभवणें. ९५

श्लोक.

मानावली पाटिलजीस उक्ति;
बोले—"असे फारचि योग्य युक्ति;

कां पौरुषा आजचि घालवावें ?
स्त्रीजातिहस्तीं अधिकार द्यावे ? ९६
चला, उठा, या, सजवीं तुह्मांतें
करोनि वेणी–फणि हो स्वहस्तें;
नसोत चोळ्या, नहि उंच साड्या,
त्या स्वच्छ देईन, असोत जाड्या. ९७
असें रात्र जागोन पोशाक केले,
तिवे साडिचोळी स्वयें शुद्ध ल्याले,
करीं कांकणें, कुंकु लावोनि भाळीं,
उषःकाल होतां निघाले सुवेळीं. ९८
विनोदें महा पाटलें रामराम
करोनी ह्मणाला "तडी न्या सुकाम !
हरा गर्व त्या सर्व यत्नें स्त्रियेचा;
नरांमाजि वानील हो धन्य वाचा !" ९९
रवि मृदु किरणांनीं लोपवी जैं तमाला,
सजवि रुचिर रंगें कांचनी कांचनाला,
समयिं तयिं बहू त्या अंबरीं शीतदायी
पवन सुटुनि खेळे; इंद्रियां तोष होई. १००

**साक्या.**

ऐशा सुंदर उषःसमयीं स्त्रीजनस्वातंत्र्यारी
आले, थकले, दमले, श्रमले कांचनपुरिच्या द्वारीं
द्वारावरि दिठला । त्यांहीं ब्रह्मकुमरि–पुतळा. १०१
सरस्वती जणुं या ज्ञानालयिं रात्रंदिन ती ठेली,
करीत रक्षण ज्ञानसिंधुचें, प्रेक्षित आलीं–गेलीं.
शोभे बहु पुतळा । रविच्या किरणांनीं सजला. १०२

पद. राग खमाज—ताल एका.

( लचक लचक चलत मोहन—या चालीवर. )

सजुनि सुहृद्सहित कुंवर आला । नगराला;
बघुनि मुकुलभर विकसित तरुवरिं मनिं धाला; तिथें ध्रु०
विटपिं विटपिं कोकिल उडति, काढिती मधु स्वराला
सुरभि ऋतुची रुचिर सरणी । बघुनि रमुनि जाइ, तिथें
सजुनि सुहृद्०. १
आभरणभर रम्य जलधर । नूतन रविप्रकाशें
सुरंगभरित करिति नृत्य, । दिसत सकळ रम्य, तिथें
सजुनि०. २
डुलति रान-मोर-कीर,करिति कपि भुःकार तिथें
शोधित सुरस भ्रमर फिरति । शोभत मही विलासें; तिथें
सजुनि०. ३. १०३

श्लोक.

स्त्रीवस्त्रभारें श्रम फार झाले,
ऐसे तिघे देवडिपाशिं आले;
घाटीण कोंडी तिथ घोडियांला
येई धराया बघुनी तयांला. १०४
कोंडी भली बाइल दांडगी ती
धिप्पाड बोले, परि नम्र रीतीं;
ऐशी असे कांचनपूरवृत्ती
कीं नम्रता नित्य असावि चित्तीं. १०५

कोंडी करी प्रश्न " कुठेंचि जातां?
कोठून हो योजुन काम येतां ?
कीं राहण्याला इकडेचि आलां ?
कीं आपुल्या जाल पुन्हा घराला? १०६

सांगा, तसे मी चरवीन घोडे
बांधोनि पागेमधिं त्यांस थोडें,
देईन पाणी, थकले बहू हे;
हा बाष्प, हा घर्म अपार वाहे[१]." १०७

## दिंडी.

करी रायाचा तनय उत्तराला—
"मायबापां त्यागोनियां घराला,
नाम एकोनी राजकन्यकेचें
वतन सोडियलें जन्मल्या दिसांचें. १०८

## श्लोक.

आहे दूरी आमची जन्मभूमी;
येथें आलों राहण्या ज्ञानधामीं;
विद्यासौख्या सेवुं जावूनि शाळे,
सांगा ऐसें जावुनी राजबाळे." १०९

## साक्या.

कोंडीपाशीं मग चवकशि ते करिती—"कोण? कशी ती
शिक्षण देई अपुल्या शिष्यां? वागवि कैसे रीतीं?"
वदती " कथ बाई। कायस्वभावी गुरुमाई." ११०

---

१ घोडे थकले म्हणजे त्यांच्या आंगांतून वाफ येत्ये, फेंस येतो, घाम येतो.

" कमलजा शशिकला दोघि या, " बोले कोंडी त्यांला,
" शिक्षण देती; असे कमलजा प्रियतर सर्वत्रांला;
आहे मधुरमुखी, । करिते शिष्यांलागिं सुखी." १११

श्लोक.

आपसांत मग ते ठरवीती—
" आवडे कमलजा, बहु रीतीं
गेलिया तिजकडे नच भीती,
ज्ञानपान करुं या तिजहातीं. " ११२
पत्र राजतनये मग लीहिती—
" चंद्रिका, रदनिका, कमलावती,
उत्तरेकडुनि येवुं तिघी स्त्रिया,
मागतों तुमचिया नगरींत द्या. ११३

दिंडी.

असों आम्ही नृपमंदिरिंच्या दासी;
इथे आलों हो दिव्यपदापाशीं
मनीं ज्ञानाची धरुनियां अपेक्षा;
नगरिं आम्हां द्या, करुं नका उपेक्षा. ११४

श्लोक.

परिसुनि गृहिं नांवा राजकन्येचिया या
रुचलि सुकृति, तेणें पातलों मुक्त व्हाया;
विनवुं कमलजेच्या शिक्षणीं राहुनीयां,
सुफलित करुं सारा जन्म, जो जाय वायां. " ११५
पत्र बंद करुनी, वरि मोहरे
सार्थ रेखिति बघा किति साजरे;
एक बाण धरुनी मदनें करीं,
चार सोडियले शर अंबरीं. ११६

स्त्रीजगीं जणुं किं ते शर सोडिले;
मूर्त्तिमंत मदनें दृढ व्यापिलें
सायकीं अखिल कांचनपूरिला;
राजपुत्रिवर मार किं योजिला[1]. ११७

साकी.

मोहरबंद त्या धाडिति पत्रा राजबाळिच्या पाशीं,
मग मुखमार्जनविधि आटपुनी प्रार्थिति प्रभुरायाशीं,
विनविति—"देवा हो !। साह्य करा, प्रभु पावा हो. ११८

श्लोक.

बहुरुपी तुजला प्रभु मानिती,
बहु तुझ्या करुणे जन वानिती;
करिं किं रूप, जयीं नरनारिचा
कधिं नये कळुं भेद निजांगिचा. ११९
हे सूत्रधारा सकळा जगाच्या,
हें सूत्र हातीं धरिलें सुखाच्या
आशेमुळें बा, तरि तें तडीला
न्यावें दयाळा, तुझि थोर लीला. १२०
हें विश्व नाटक असे, मधिं नाट्यकार
तूं सर्वभूतिं नटशी अजि सूत्रधार;
स्त्रीजातिच्याहि परि मंजुळ होवु वाचा,
हा नाटकी सुनट थाट दिसोचि साचा." १२१

---

संकेत-नामक प्रथम सर्ग समाप्त.

---

१ ही कल्पना चंद्रकेतूची. कांचनपुरीच्या स्त्रिया मदनवश नव्हत्या; होण्याचें कारण नव्हतें; केवळ चंद्रकेतूच्या मनांतला उद्देश, तो मदनवश.

# स्त्रीनगरप्रवेश–नामक सर्ग दुसरा.



## श्लोक.

उगवतां रवी द्वारपालिका
स्वकरिं आणुनी अंबरादिकां,
नविन पातळें स्वच्छ शुभ्र तीं
हिरवि चोळि दे एककाप्रती. १
देउनी तयां बोलली–" चला,
इंदिरेचिया जाउं भेटिला;
सोडुनी जुनें वस्त्र, येथलें
पाहिजे तुह्मां नित्य नेसलें." २.
लेवुनी तिघे श्वेत अंबरा,
स्त्रीजनांसवें बुद्धिसंगरा
चालले तदा मिष्ट भाषणें
इंदिरेचिया भेटिकारणें. ३
इंदिरा नृपसुता-अभिधान,
बुद्धिचें न जिचिया कधिं मान
होइ, ती निवळ सर्व पसारा
चालवी स्वमतिनें कुलतारा. ४
शुभ्रसे चिरे संगमर्वरी
आजुबाजुला मंडपांतरीं
स्वच्छ घोटले पूर्ण रेखिले
विस्मयें बहू त्यांहिं देखिले. ५
स्त्रीजनें स्वयें बुद्धिच्या बलें
मंडपास त्या हातिं बांधिलें;

चालतां तिघे इंदिरेकडे,
पाहती क्रमा, नित्य जो घडे. ६
उदयिं त्या दयिता, नवयौवना,
विगलिता, प्रवयस्क कुलांगना,
उठुनियां करिती प्रभुवंदना,
स्मरति भावभरें जगजीवना. ७
परि बघा किति माद तयां मनीं,
पुढिल मंजुळ ईश्वरगायनीं
पुरुषवाचक नाम मुळीं नसे,
प्रभु किं नारिरुपीं जगतीं वसे. ८

भुपाळी. राग बिभास—ताल एका.

(घनश्याम सुंदरा—या चालीवर.)

विश्वजननि, जगदंबे, धात्री! तुज अवघ्या कामिनी
भगिनीमंडळि विनवुं दयाळे! यश दे आह्मां जनीं ॥ ध्रु० ॥
स्त्रीजातीला अबला ह्मणुनी, कोणि न त्यांतें गणी;
पुरुषगणांच्या दास्यांतुनि गे, सोडविं आह्मां झणीं;
गर्वें लोभें मदें मत्सरें, पुरुष बहुत अवगुणी,
सत्ता करिती आह्मांवरि ते, ह्मणविति अमुचे धणी;
सावकार ते होउनि बसले, असतां अमुचे रिणी;
नित्य गृहीं कावाड वाहवा, ना तरि दुःखें दुणीं.
॥ चाल ॥ या भवार्णवीं हें केलें कैसें जिणें?
परतंत्र ठेविलें आह्मां, स्वातंत्र्यसुखाविणें,
कलुषित होती मनें, व्यर्थ होति भांडणें;
॥ चाल ॥ नरनारींच्या भीतरीं तयिं नसे स्वस्थता
मनीं ॥ १ ॥ विश्वजननि०. ९

## श्लोक.

स्त्रीवृंदें ही प्रार्थना दीन केली
मित्रांनीं ती संगतीं आयकीली;
सोडोनी तें मंडपाला निघाले,
जावोनीयां इंदिरेपाशिं ठेले. १०
बैसे एका उच्चशा आसनीं ती,
सौंदर्याची शोभते पूर्ण मूर्त्ती,
चालें बोलें रम्य संतोषदायी
साजे साऱ्या कांचनीं दिव्य आई. ११
पायांपाशीं व्याघ्र निश्चेष्ट होते
दोघे तेथें, इंदिरेनें स्वहस्तें
होते बाल्यापासुनी वाढवीले,
तैं तीच्या स्वाधीन ते पूर्ण झाले. १२
ब्रह्मांड हें हुडकितां जिस जोड नाहीं,
जी सांठवी बहुकळा अपुल्या सुदेहीं,
स्त्री-उन्नतीविण दुज्या नचि वासनांला
चित्तीं धरी; अशि सती भुलवी जगाला. १३
नखशिखान्त दिसे बहु गोजिरी
निजरुपीं तशिही गुणिं सुंदरी;
त्यजुनि आसन ती मग मावली
जवळि येउन त्यांप्रत पावली. १४
अभिमुख उभि राहे. दिव्य ती इंदिरा हो,
नृपसुत मनिं बोले, दीर्घ ही काळ राहो!
सुखि बहु मनिं झाला पाहुनी अंगना ती,
चिर सुख अनुलक्षी, प्रेम त्या नेत्रपातीं. १५

साकी.

वाटे राजसुता कीं अपुला टाकुनि द्यावा वेष,
कवळुनि ऐशी सती उराशीं, सांगावा उद्देश;
परि मन थांव ह्मणे, । जाई कार्य न तडि तेणें. १६

श्लोक.

बोले राजसुता "महागुणि तुह्मी, हो धन्य साच्या सती
आलां या नगरींत, होउ तुमचा उत्कर्ष सारे रितीं,
स्वीकारा पथ जो स्वयें निजहिता यत्नीं बहू काढिला,
सेवा पंथ अह्मांस मान्य दिसतो, तो पाहिजे वाढला. १७

दिंड्या.

काय तुमच्या गांवच्या स्त्रिया ऐशा
उंच असती कीं ताड माड जैशा?"
तदा शशिवदनें उत्तराशि केलें—
"राजमंदिरिंहुन हें त्रिकूट आलें." १८
"असां तुह्मी का राजधामिं नारी?"
नम्र वाणीनें इंदिरा विचारी;
"तरी का हो जाणतां राजपुत्र?"
वदे, परिसा, शशिवदन प्राणमित्र—१९
"सकलसद्गुणसंपन्न मोदराशी
शौर्यमूर्त्ती नरवीर जो तुह्मांशीं
दिव्य हेतू हा हृदयिं वागवीतो,
अन्य कोणा वरणार ना ह्मणे तो." २०

श्लोक.

परिसुनि नृपकन्या वाक्य हें, काय बोले–
"न कधिं वचन ऐसें ग्रामिं या आयकीलें;

पुरुषमुखिं असारा वाक्यमाला सदा ही
निघत असति; येथें काढणें इष्ट नाहीं. २१
आलां येथें वाटतें ह्यावरोनी
ज्ञानेच्छा ती अंतरंगीं भरोनी,
ज्ञानप्राप्ती साधण्या वाट पाहां;
अज्ञानाचा वाद कां हो तरी हा? २२

दिंडी.

राजपुत्राचा मुळिं विचार कांहीं
स्पष्ट सांगें, मन्मनीं येत नाहीं;
स्वप्निं देखिल तो, सर्व कांहिं त्याचें
नाहिं ठाउक, हें वचन असे साचें. २३

पद राग कामबोध (प्रबंधाचे चालीवर); ताल—सुरफक्का.

(नमो भक्तसुरतरुलते—या चालीवर.)

मनीं इष्ट बहु काळ संकल्प केला,
वाढतां देह तो स्पष्ट झाला ॥ ध्रु० ॥
लग्न जें भग्नस्वातंत्र्य हो होइ तें
नाहिं मी करणार, सत्य सांगें,
स्त्रियां लग्नाविणें सार्थ नाहीं जिणें,
व्यर्थ हें बोलणें; काय शोभे? ॥ १ ॥ मनीं इष्ट०
अज्ञाना जोंवरी, टाका ना तोंवरी,
सखींनो तुम्हाशीं होय पीडा,
नरदास्यीं जातसे जन्म सारा दिसे,
भावतें, नर तसे वागवीती. ॥ २ ॥ मनीं इष्ट०. २४

दिंडी.

स्त्रिया पुरुषांचीं असति खेळणीं तीं,
बालकांच्या जणुं बाहुल्या किं हातीं,

काळ येइल निश्चयें तुह्मां सांगें,
मुक्त होऊं एकल्या ज्ञानमार्गें. २५

श्लोक.

सम–विषम गृहीं तें पाहिजे हो कशाला?
सम–सम नरनारी कां न तीं आपणाला
समजुनि मनिं देती साह्य तें एकमेकां?
कधिं मग गृहिं तेणें नाहिं येणार धोका." २६

हें वाक्य येतां विषतुल्य कानीं
खालीं मुखें केलिं सर्वें तिघांनीं;
वाग्बाण गेले तळिं अंतराच्या
स्त्रीमुक्तिहंत्या नटल्या नरांच्या. २७
एक नार दिसण्यांत सुमावली
नम्रपाद पुढती सरसावली;
वाचुनी कथितसे मधुरा रिती
स्पष्ट कांचनपुरीनियमास ती. २८

दिंडी.

"तीन वर्षें गृहिं नाहिं जावयाचें;
तीन वर्षें नगरींत राहयाचें;
तीन वर्षें संसर्ग मुळिं नरांशीं,
नये ठेऊं व्यवहारही घराशीं." २९

श्लोक.

नियम अणिक ऐसे अन्य नानाप्रकारी
परिसुनि पटिं नांवें घालती वेषधारी,
वदलि मग तयां ती "धीट व्हा, नीट वागा,
स्वगृहिं करितसां जे सर्व आचार त्यागा. ३०



असों द्या क्रिया सर्व कालानुसारी,
पहा वर्त्तती केविं येथें सुनारी,
असा जैं नव्या, सिद्ध व्हा शुद्ध व्हाया
लतांचे परी कोंवळ्या हो वळाया. ३१
नका हो स्मरूं गोकुळींच्या व्रताला,
नसे कृष्ण येथें, न ती कृष्णलीला,
सदा जानकीसत्त्व जीवीं धरा हो,
तिचें मानसीं योग्य धारिष्ट राहो. ३२
बळें लोभें सीते दशमुख जयीं दुःसह रिती
करी कष्टी तीतें, तरि निज न सोडी व्रत सती,
तशा तुह्मी व्हा हो; सकळ तुमची वृत्तिहि तशी
न झाल्या, होई हो कधिंहि तुमची उन्नति कशी? ३३
सती सीता साध्वी सकळ जगता शिक्षक सदा,
धरा निष्ठा ध्यानीं विमल तिचिया ग्या तुह्मि पदां,
सहस्रा तोंडांची प्रबल नरदासत्व-असुरी
स्वहस्तें हाणाया, सकल युवती व्हा, तुह्मि अरी. ३४

### दिंडी.

रासरंगें गोपींस वेणुनादें
पडलि भूल, तशा भुलूं नका नादें;
रुक्मिणी ती जशि कृष्णनिष्ठ होती,
तशी निष्ठा निजकार्यि तुमचि हो ती. ३५
पंच पतिला ज्या एकनिष्ठ पत्नी
सती द्रौपदिनें सेविलें सुयत्नीं,
तिची निष्ठा तुह्मि मानसीं धरा हो,
कार्यि तुमचें या चित्त तेविं राहो. ३६

निंद्य राक्षसि पूतना दुराचारी
कृष्ण मारूं ने विषा दुग्धधारीं,
रामकाळींची शूर्पनखा दंशी,
अशां माना तुह्मि तुच्छ सर्व अंशीं. ३७

श्लोक.

रामाप्रती ती शबरी स्वभक्तिनें
जेवीं स्तवी, तेविं तुह्मी सुरीतिनें
स्त्री-लोक-उत्कर्ष गणूनि राघव
कार्यीं झटा; होइल प्राप्त वैभव. ३८
जशी काळिका दुष्ट ह्मैसासुराला
वधोनी करी तुष्ट साऱ्या जगाला,
वधा तेंवि स्त्रीदास्य-ह्मैसासुरा, तो
तुह्मां बालकांचे परी वागवीतो. ३९

साक्या.

चिलयामाता देखा कैशी होती निष्ठावंत,
दिधला आपुला पुत्र पोटिंचा, तोषविला तैं संत;
दुःखें मन दाटे, । परि ना संतभक्ति आटे. ४०
दमयंती नळभूपतिजाया पतिविरहानें कैशी
व्याकुळ झाली, परी वरी ना कोण्या अन्य नराशीं,
ऐशा निष्ठेच्या । सखिनो व्हा तुह्मी साच्या. ४१

श्लोक.

हिमनगतनयेनें भिल्लिणीच्या स्वरूपें
वनिं निजपतिसत्त्वा देखियेलें प्रतापें;
दृढ बळ तयिं दावी आपुल्या निग्रहाचें,
सतत मनिं असों द्या धैर्य हें पार्वतीचें. ४२

प्रविकळ रथचक्रा संगरीं कैकयीनें
स्वकर परम युक्ती घालुनीयां धिरानें,
रणभुमिवर वेगें चालवीलें रथाला,
दशरथ पतिराया, धन्य! नेलें यशाला. ४३

देखा दक्ष कशी स्वधर्मअवनीं ती दिव्य तारामती,
दुःखें पीडित जो फिरे पति गुणी त्याच्या सवें ती सती
उल्लंघी गिरिकंदरां, मुळिं गणी ना ताप ना आपदा,
प्रेमें दुःख न मानुनी, निजपती सेवीत भावें सदा. ४४

लक्ष्मी सती केविं बघा उदार !
वाहे जगाचा शिरिं कारभार,
बोलोत हो चंचल ती असे कीं,
चांचल्ययोगें सुख होइ लोकीं. ४५

द्वारीं पहा शोभत शारदा ती,
साऱ्या जगा ज्ञानसुबुद्धि देती,
विद्याप्रसाराप्रति कारणीं जी.
ज्ञानामृता ती जगतास पाजी. ४६

साक्या.

स्मरणीं आणा मुक्ताबाई होती कैशि विरक्त,
अविवाहित राहुनियां जन्मीं, झाली निश्चळ प्रभुभक्त.
अति प्रेमळ कवितें। गाउनि तोषविले श्रोते. ४७

नाम्याची सद्भक्तिपरायण पवित्र प्रेमळ दासी
जनाबाई ती दुजी आठवा, वर्त्ते जगतीं कैसी?
ह्मणवी "वेडिपिशी" । "जना" ती नव्हती परि तैशी. ४८

श्लोक.

कृष्णाकुमारी किति सौम्यवृत्ति!
आज्ञा पित्याची समुळीं सनीती
पाळोनि दावी पुरुषां, सुबाळी
स्त्री मृत्युला भीत कुण्या न काळीं. ४९
सुराज्ञी अहिल्या स्मरा इंदुरींची,
तळीं खोदवी गांविंचीं तीं दुरीचीं
कशीं; अन्नछत्रा स्वधर्मानुसार
उभारोनि, दीनां सुखा दे अपार. ५०

दिंडी.

श्रेष्ठ भक्तिणिंमधिं देवि मिराबाई
होइ; कौतुक किति करूं सांगुं काई!
रचुनि काव्यें ती गाइ मधुर वाणी!
गणा स्त्रीलोकीं तिला धन्य प्राणी. ५१

श्लोक.

अशा या स्त्रिया थोर साध्वी प्रतापी
पुराणीं कवी-संत-योगी-कलापीं
सुखें वर्णिती, त्यां इथे मूर्त देखा;
तशा व्हा, स्वनामा चिरंजीव राखा. ५२

साकी.

तुमच्या उत्तेजनार्थ पुतळे त्यांचे जागोजागीं
उभारले, फलप्राप्ती त्याची होवो तुह्मांलागीं,
न्यहाळा हे पुतळे, । अपुले सुखवा हो डोळे. ५३

### श्लोक.

गतानुगतिका पथा त्यजुनि, वास येथें करा;
विभूति निज जातिच्या सतत रक्षणीं तत्परा
सदा बघित या, असा; अति महानुभावाकृती!
पवाल अनुभूति जोंवरि, बघाल त्यां त्यां प्रती. ५४
उदात्त मन होउं द्या, सकळ हेतु ते आमुचे
विमुक्तिपर आदरा; हित करोन घ्या तूमचें;
स्त्रियां अति अलभ्य जो दिसत आज विद्यांबुधी
करीं सुगम त्या, जरी नर ह्मणे स्त्रिया मंदधी. ५५
स्त्रियांना पराधीनसें वागवीलें
असे त्या नरांनीं, बहू दीस झाले;
अशा या पराधीनते अंत येई
करा तोंवरी ज्ञानपाना, सुनारी! ५६
अज्ञान जन्या तुमच्या प्रमादां,
धीमत्सरा, तेविं जनापवादां,
निंदाप्रवृत्तीप्रति अंत येई,
ज्ञानामृता प्या, इथ तों सुनारी! ५७

### आर्या.

जीवन निष्कामी तें मन असल्याला उदारता-शून्य
जगिं राहणें नको तें, मरणें त्याहून वाटतें धन्य." ५८

### दिंडी.

असें बोलुन त्यां दावि अंगुलीनें
जिथें होता मांडिला कमलजेनें
वर्ग अपुला; तिथ जा तिघांस सांगे,
दिली दासी, ते जाति तिच्या संगें. ५९

श्लोक.

वर्गीं आले; देखिली त्यांहिं कांता
शिष्यां शोभे दिव्य जी सेव्य माता,
राहे ऊभी घेउनी ग्रंथ हातीं,
आनंदोर्मी दावुनी नेत्रपातीं. ६०
बाजू एका पाळण्यामाजि बाल
नामें होतें मंजुळा; हालचाल
नाहीं कांहीं; निद्रित स्वस्थ होतें,
वाटे विश्वीं अन्य नोहे सभोतें. ६१
अहा ! बालकांनींच निद्रासुखाचा
महानंद घ्यावा; न त्यांतें भवाचा
वृथा हा पसारा कदा दुःख देई;
सदा मानसीं बाल संतोषि राही. ६२
वर्गीं होत्या बैसल्या जागजागीं
विद्यार्थी तैं ज्ञान-संप्राप्तिलागीं;
कोणी मागें, कोणि त्या अग्रभागीं;
तेथें तेही बैसले कंपितांगी. ६३
कमलजा तिथें दृष्टि फेंकुनी
नवशिक्यांप्रती पाहि रोंखुनी;
कमलजेस तो बंधु पाहुनी
बहुत हर्षला आपुल्या मनीं. ६४
विनय हो किती डोळियामधीं;
जणुं किं शोभते मूर्तिमंत धी !
"कमलजा ! स्वसा !" काढि तो जरी
ध्वनि, हळू न तों योग्य तैं तरी. ६५

"रूप हो किती!"–बोलला शशी[१]—
"रम्य हें दिसे; शोभत्ये कशी!"
"हो उगा!" वदे राजपुत्र त्या,
"पाहिजे हंसें कां अजाणत्या?" ६६

केंवि आयका कमलजा गुरू
पाठ नित्यचा मग करी सुरू—
"ज्ञानभुक्त ज्या मज तुह्मी दिसां,
मुक्ति जों मिळे तंव इथे वसा. ६७

जगतिं हो पहा का गती असे,
बळ जयीं तयीं श्रेष्ठता वसे;
सबळ व्हा, तरी ये यश श्रमा,
मनिं अशा धरा सृष्टिच्या क्रमा. ६८

देखा स्त्रियांना जन वागवीती
नाना प्रदेशीं अजि कोण रीती,
ते तुर्क, तैसे चिनि ते, दुराणी,
अफ्गाण, सिंधी, बलुची, इराणी. ६९

कैसा स्वयें बांधुनियां जनाना
कोंडी मुसल्मान वधूंस नाना;
देखे तयां नित्य कुशाग्रदृष्टी,
संदेह पोटीं, मुखि गोड गोष्टी. ७०

कशा बाला प्रौढा विगतधव होतांचि युवती
अह्मां हिंदू लोकीं अखिल अपुलें आयु मुकती,
सती बोलोनी स्त्रीदहन करिती, निष्ठुर किती!
स्त्रिया सोसूनी ही भयकर दशा "हाय" वदती. ७१

---

१ शशिवदन.

शरीरा सौंदर्या वपनविधि विच्छिन्न करितो,
पती जातां पत्नी-भव-सुख सदा सर्व हरितो;
भ्रताराचा केशांप्रति कवण संबंध न कळे,
किती क्रूरा दृष्टी! पुरुषमन तें ना हळहळे. ७२

जरी एक भार्या मरे त्या नराची,
तिचे दीस[1] झाले न, तों अन्य याची;
स्मशानीं दुजेची करी चौकशी ती,
जिथे एक पत्नीचिता पेट घेती! ७३

असे काय ऐशा नरां पोटिं माया?
तुळावें यमाशीं अशा कीं नरां या;
वराया स्वयें जो दुजी नार पाहे,
न जाणे स्त्रियां केविं वैधव्य साहे. ७४

'कुलीन' स्वयें आपणांतें कितीक
जगीं बोलवीती; स्त्रियांतें अनेक
वरोनी रहाती! मनाचे विशाल!
सहस्रा स्त्रिया तद्गृहीं मावतील! ७५

कुलीनत्व का हें? पुरें हीण साचें;
वधूचें असे पाप, तैसें वराचें.
जसा वाहती ते शिरीं केशभार,
स्त्रिया मावती तेविं गेहीं अपार! ७६

बिचाऱ्या गुलामापरी दीनवाण्या
गृहाभीतरीं सेविती अन्नपाण्या;
जशीं लोळती श्वान-मार्जार गेहीं,
बसावें तशा रीतिनें त्या स्त्रियांहीं. ७७

---

१ तेरा दिवस.

स्त्रियांनीं रांधावें; भरुनि घट ते स्वच्छ उदकें
कटीं खांदीं न्यावे श्रमत, जरि तो प्राणहि थकें;
दळोनी, कांडोनी, निसुनि, टिपुनी, धीर धरुनी
खपावें, ऐसेंही निशिदिनिं जिवा त्रास करुनी. ७८

पतीलागीं कांहीं स्वकृत रुचलेंना कधिं जरी,
शिव्या लत्ता घ्याव्या करुनि इतुकें त्याहि उपरी !
मुलांचे काढावे श्रमुनि दमुनी कष्ट सकळ,
कुमार्गीं तीं जातां बहुत तिज लागे हळहळ !" ७९

### साकी.

अशी गृहदशा वर्णुनि, तीणें विषय दुजा वर्णाया
आरंभीलें; असे गहन, परि ऐकवि तो निज शिष्यां;
स्त्रियां सुगम झाला, । जो दुर्गम बहु पुरुषांला. ८०

### श्लोक.

सांगे पुढें विश्व कसें उदेलें,
निर्माण कीं दैवगती जहालें,
कीं सर्व हा मायिकसा पसारा
होवोनि गेला निमिषांत सारा. ८१.

असे ब्रह्म आधीं किं झालें स्वयंभू;
स्वराकाश वायू तथा तेज वार्भू
जहालीं स्वतःसिद्ध कालक्रमानें,
घडीलीं किं एक्या प्रसंगीं विधीनें. ८२

### आर्या.

मग ती खगोलवर्णन सुश्राव्य करी बहूत चातुर्यें,
जें ना खगोलवेत्त्या ज्ञात्या पुरुषां कदापि करितां ये.८३

ग्रह-मंडळ-रचना जी प्रथम असे कल्पियेलि **लाप्लासें**,
ओत्यांतें वर्णीली, गहन जरी ती तथापि उल्हासें. ८४

श्लोक.

प्रारंभिं सृष्टी अति उष्ण तेजी,
विस्तीर्ण वायुस्वरुपें असे जी,
कालान्वयें थंडशि होत गेली,
श्रेणीक्रमें केंद्रिं सुकीर्ण झाली. ८५
केंद्रस्थ त्यानंतर सूर्य झाला,
जो आद्य आजी ग्रहमंडळाला;
केंद्रा त्यजोनी ग्रह फीरताती,
साक्षात् बघा दाविं रवीसभोंतीं[२]. ८६

पृथ्वी, मंगळ, चंद्रमा, बुध, गुरू, तो शुक्र, तोही शनी,
अव्याघातित फीरती रविचिया भोंतालि रात्रंदिनीं;
कीं सूर्या ह्मणती:–'अरे असशि कीं आह्मां ग्रहां सारिया
शोभा; दे चिरकाल ती! करितसों त्वच्छक्तिच्या विस्मया!८७

तूं दिव्य तेजोमय जीव गोल
साऱ्या जगा पोसिशि रे अमोल!
तूं प्राणराखा सकळां जिवांला,
अत्यंत रे शोभविशी नभाला! ८८"

---

१. The Nebular Theory of the French Astronomer and Mathematician Laplace—( 1749–1827 ). It is otherwise known as the Nebular Hypothesis [ see P. M. Wallace's annotated Edition of the Princess, 1897, London ].

२ असें ह्मणून नकाशावर आणि प्रत्यक्ष ग्रहमंडळगोल नमुन्यावर फिरणाऱ्या यंत्रानें शिष्यांस दाखविले.

### आर्या.

कथि मग गुरुमाता ती प्राणी जन्मा कुण्या रिती आले,
उद्भिज्जां जीवन तें प्राप्त कसें श्रेणिश्रेणिनें झालें. ८९
कृमि-कीटकादि प्राणी, स्वेदज अंडज दुजे अनेक तसे,
जारज सस्तन, सांगे अंतीं सृष्टींत येति तेचि कसे. ९०

### दिंडी.

कसा मानव तो क्षुद्र अणू-ठायीं
बनुन, जन्माला दिव्य देह येई;
कसा घडुनी तो रोमरंध्रपिंड
वंश पितरांचा वाढवी उदंड. ९१

### श्लोक.

सिंहावलोकन करी मग ती सुवाचा
योजून, सांगत तदा इतिहास साचा,
देशीं विदेशिं कशि मानवजातिमाजी
होती स्थिती कवण ती कथि, होय आजी. ९२

### दिंडी.

कुण्या रंगें माखिले, कशा वेषीं
असति पूर्वज ते कोण, कुण्या देशीं,
कुण्या हिंडुनि वनिं झोंप सुखें घेती,
काय खाती पिति कुठें कशा रीती. ९३

### श्लोक.

कंद-मूळ करितात किं सेवन,
पाचितान्न-रस-युक्त किं भोजन,
वल्कलें करिति ते परिधान तीं,
व्याघ्र-ऋक्ष-मृग-चर्म किं नेसती. ९४

दिंडी.

आर्यभूमीच्या ठायिं पूर्वि झाले
संत साधू ऋषि तयां वर्णियेलें;
विशेषें ज्या या आर्यदेशिं झाल्या
स्त्रिया श्रेष्ठा, त्या कथी श्रोतियांला. ९५

श्लोक.

अशी पूर्वजांची स्थिती पूर्वकालीं
वचें गोडशा श्रोतियां सांगियेली;
स्त्रिया सर्व साद्यंत तें आयकीती;
किती वागती वार्गे त्या योग्य रीती! ९६

नाहीं कोणी काढिला शब्द तोंडीं,
ऐशी स्त्रीच्या शांतता पूर्ण हार्डी,
व्याख्यानाच्या शेवटीं हें भविष्य
साध्वी बोले, कीं तिला सर्व दृश्य—९७

"जैं तैं स्वामी खास होतील दोन[1],
जेथें तेथें दोन जाती मिळोन
एका मानें एकवृत्ती सुचित्तें
दोन्ही एका चालवीतील सत्ते. ९८

ज्ञानाचीया वृद्धिलागीं हि तेवीं
दोन्ही एका कारणीं सुस्वभावीं
लागोनी उत्कर्ष तीं पावतील,
सत्कार्यीं तैं जीवना लावितील. ९९

१ स्त्रिया आणि पुरुष; एकटा पुरुषच आज स्वामी आहे; स्त्रिया गुलाम किंवा दासी, असा अर्थ.

"युग्म"

चित्रयोग, मनमोहक गायन,
नृत्य, नाटक, मृदंग-सुवादन,
धातुशोध, तरुयोग, रसायण,
वस्तुधर्म-सुविवेचन, तक्षण, १००
वास्तु, शिल्प, सुकला बहू दुज्या
आह्मि आजवरि जाणतों न ज्या,
गूढ आजिवरि जें असे स्त्रियां,
निश्चयें शिकवुं तें इथे तयां. १०१

येई काळ जयीं स्त्रिया जिथ-तिथें होतील त्याही कवी,
सृष्टीला सुख देतिल स्वमतिनें काव्यें रचोनी नवीं;
सौंदर्या कथितील त्या जगतिंच्या, मांडोनियां गायन;
ऐशा स्त्री-कविंचें अशा नगरिं या आह्मी करूं पालन." १०२

दिंडी.

पुरें होतां व्याख्यान, कमलजेनें
खूण केली तिघां बहू नम्रतेनें;
सर्व विद्यार्थी आपआपुलाल्या
नित्यकार्याला जावया निघाल्या. १०३

तिघे गेले तिजपाशिं नारिवेषी,
तयां बोले ती, "बुद्धि तुह्मां खाशी
असे सुचली कीं एथ तुह्मी आलां
तुच्छ मानूनी पुरुष-मोह-जाला". १०४

श्लोक.

बोलोनि ऐसें निघतांचि जाया
ती आपुल्या ओळखि बंधुराया;
"हे बांधवा!"-"हे भगिनी!"-असें तीं
परस्परां बोलुन ओळखीती. १०५

### साकी.

भरधांव जशी नौका तरतां जलधी–पृष्ठावरती,
एकाएकीं शिडें कोसळुनि, फडफड उडुनी, ती
अस्ताव्यस्त डुले, । तैसें या घडिं तिज झालें. १०६
शब्द दाटला कंठीं तिचिया, नुमजे काय वदावें;
नुरे भान; उद्भवली चिंता कां भावानें यावें,
कवण मिषें । भाऊ येई स्त्रीवेषें ! १०७

### श्लोक.

"तूं काय येथें करितोसि बाळा ?"
बोले स्वसा मारुनि हात भाळा;
"हा वेष ! हे कोण ? कुठें निघाले ?
कीं लांडगे मेष-समूहिं आले! १०८
हे माय–शक्ती, अबला–जगाला
घाला विनाशी अजि केविं आला !
या कृत्रिमानें विलयास जाऊं";
भाऊ ह्मणे, "तेविं घडों न देऊं." १०९

"नाहीं देखियला" ह्मणालि भगिनी "द्वारावरी लेख का?
**'येई स्त्री–जगतामधीं पुरुष जो, प्राणा मुके तो फुका;' "**
बोले बंधु सुशांत तैं भगिनिला "का स्त्रीजनांहातुनी
झाली आजवरी असे कृति अशी, गेलां जरी मातुनी? ११०
बोलावें तुह्मि हो, दटावुनि उगा, अंगीं मुळीं ना बळ,
ऐशा भ्याड असां तुह्मी किं; 'अबला' हें नाम हो केवळ
तुह्मां योग्य दिसे." तदा भगिनिनें केलें तया उत्तर,
आवेशें चढवोनियां भ्रुकुटिला, काढोनि उच्च स्वर– १११



दिंडी.

“नसे थट्टा ही, सत्य मीच बोलें,
जरी आजवरी बोलुं तें न केलें,
परी घडुनी येईल सर्व आतां,
धैर्य आलें बळ आमुचिया हातां. ११२

राजतनयेच्या जाउं नको वाटे,
तिच्या मार्गीं रे असति बिकट कांटे;
उगें माझ्यानें बसवणार नाहीं,
वृत्त कळवाया तिजशिं जाउं पाहीं. ११३

श्लोक.

का अग्निशीं कोण कधींहि खेळे ?
का तैल पाण्यांत कदापि भेळे ?
का शस्त्रधारेवरि तीक्ष्ण कोणी ?
ठेवी बळें अंधपणें स्वपाणी ? ११४

का तांदुळांमाजि उडीद भेळे ?
बाजू कड्याच्या कुणि काय लोळे ?
वाटे तुह्मां ही अवघीच थट्टा;
लावीतसां हो स्वकुळास बट्टा. ११५

भासे मातें करणि तुझि कीं व्यर्थ आलासि येथें;
जा रे, जा तूं परतुनि गृहीं योग्य मार्गें किं जेथें
शौर्या ज्ञाना सकलहि तुझ्या स्तुत्य हेतू मिळेल;
येथें प्राणा मुकशिल फुका काय तेणें फळेल? ११६

पद. रागिणी भैरवी,—ताल त्रिवट.

योजुनि कायचि आलां ? । भ्रात्या ! ॥ ध्रु० ॥
धारण केलें स्त्री–वसनां कां ? धीट कसे अजि
झालां ! । भ्रात्या० ॥ १ ॥
घेत असां शिरिं दुर्घट कार्या । नुमजे काय
तुह्मांला ? । भ्रात्या० ॥ २ ॥
काय ह्मणावें, ऐशा तुमच्या सांगा पुरुषा-
र्थाला ? । भ्रात्या० ॥ ३ ॥" ११७.

साकी.

बोले तयिं तो बंधु भगिनिला कोपित बहु होवोनी–
"कैसें गेलें वात्सल्य तुझें विलया अजि पावोनी" ?
झाला विस्मित तो । भगिनिस आवेशें वदतो. ११८

श्लोक.

"तर मग भगिनी तूं प्राण माझा ग घेईं;
तनुचि करुनि रक्षा ती पुरीं भूमि–ठाईं,
पुरशिल जिथ ती तैं लेख तूं गे लिही हा—
'भगिनिकरविं आला मृत्यु या बंधु-देहा' ".११९

साकी.

ऐकुनि तैं त्या शशिवदनानें वाद असा मित्राचा
ह्मटलें,–"वाणी कमलजेचि ही, ऐकुनि धालों साचा,
बोले गोड किती! । उठले शब्द हिचे चित्तीं. १२०
पाहिलि ऐशी साध्वी नयनीं झालों मी कृतकृत्य !
विचार हीचे गहन किती हे ! ज्ञान हिचें बहु स्तुत्य !
मृत्यू इथ येतां । देइन प्राण तया आतां." १२१

## श्लोक.

आतां पुढें येउन चंद्रकेतू
संपूर्ण सांगे तिजला स्वहेतू—
"गे आवडे नित्य सुसत्यवाचा,
ऐकें तरी या कल मानसाचा. १२२

देहीं या तूं देख गे राजपुत्रा !
ज्यालागीं त्या इंदिरे दिव्य पात्रा
होतें जन्मापासुनी योजियेलें;
येणें तीच्या भेटिलागींच केलें. १२३

तुझ्या देश–बंधूस येथें पहा गे!–
जयाचे मनीं इंदिरा नित्य जागे;
इथे ती वसे, वाटलें येथ यावें;
न यावें तरी भेटि कोठेंचि जावें?" १२४

वदे तीः–"स्वदेशास नेणेचि देहो;
उरे देश–बंधुत्व मातें कुठें हो ?
वसे ग्राम माझा, इथे सर्व कांहीं;
सदा इंदिरे सेविती येथ राहीं. १२५

तिचा देश तो देश माझा असावा,
तिचा धर्म तो धर्म म्यां आचरावा,
तिचें कर्म जाणोन चित्तीं धरावें,
तिला वंद्य मानोन येथें रहावें. १२६

संकल्पा करुनी अशा दृढ मनें अव्हेरिला ग्राम मीं;
व्हाया साह्य सुकामिं राजतनये आयुष्य येथें क्रमीं;
होत्यें जी अबला स्वयें बदलुनी गेल्यें असें मी पुरी,
झाल्यें पूर्णपणें स्वतंत्र, तुमजे आतां जुनी वैखरी. १२७

लग्नाची मुळिं गोष्ट इष्ट इकडे ग्रामीं नसे आमुच्या,
येथें सर्व कुमारिका गतधवा पाशांस संसारिंच्या
त्यागोनी सुखद स्वतंत्रपण तें स्वच्छंद सेवीतसों,
वार्त्ता काढूं नको विवाहविधिची, ती तुच्छ मानीतसों. १२८

वचन दिधलें आहे म्यां, हें तिचें व्रत साधिन;
तन–मन तिच्या कार्या आर्या! दिलें तिज अर्पुन;
बहु दृढ नरश्रेष्ठा निष्ठा असे तिचि कामिं या,
बघुनि नगरी भासे कैसें न हें तुज कामिया? १२९

दिंडी.

अतःपर हो मी धनिण माझि नाहीं,
नसे हातीं अधिकार मुळिंच कांहीं;
जरी मारिल ती जिवें राजबाळी,
पडे मरणें हो भाग तये काळीं. १३०

सांगवेना; जरि कळे तिला वृत्त
पुरुष आल्याचें, क्षोभुनी किं चित्त
जिवें मारिल वा तुह्मां हांकुनीयां
हद्दपार करिल मंदिरांतुनी या. १३१

मुखावाटे मम एक शब्द आला
तुह्मांविषयीं कीं भडकतील ज्वाला;
उगी राहें तों सर्व असे शोभा;
वृत्त कळतां इंदिरा करिल क्षोभा. १३२

आर्या.

का ना ठावें तुजला, नाहीं स्त्री ही, असेचि सिंहीण;
कळतां कोण तुह्मी हें तुमचे जातील हो गमे प्राण. १३३

द्वारावरच्या लेखा सोज्ज्वळ पाहुनि कसे इथें शिरतां?
'**मारूं पुरुषां**' ह्मणतों, प्राणा तुह्मि कां उगाचि अंतरतां. १३४

जा बंधो! मित्रांसह, तिज कळण्याआधिं शीघ्र पळ काढीं,
आलां तैसे परता; पडतां काळाचिया फुका दाढीं! १३५

वर करण्यालागीं बा मानस नाहीं कदा तिचा होणें;
जरि इच्छित न घडे हें, वाटे मातें प्रशस्त तुह्मि जाणें. १३६

श्लोक.

बोले राजकुमार तैं, "गमतसे द्वारीं जरी तें लिहा—
'मारूं त्या पुरुषास जो इथ शिरे'—मानूं न हो लेख हा;
प्राज्ञा काय असे जरी ह्मणतसां प्राणास घेऊं स्वयें?
वीरांशीं पडतांच गांठ समजे कीं त्यांशिं भांडूं नये. १३७

जैसा शेतकरी उभा करितसे शेतामधीं बाहुला,
हालेना, न चले, न शक्ति करिंही, ना स्थैर्यही पावलां;
राहे जोंवरि तो उभा, भिववि तैं ढोरां गुरां, पांखरां,
भ्यावें भ्याडजनें तसें धमकिला, यावें न या मंदिरा! १३८

आम्ही युद्ध करूं, न भ्याड जन गे मारूं किं युद्धीं मरूं,
जिंकोनी कृतकृत्य होऊं जगिं या, कीं भांडतांना हरूं;
कांहींही घडलें तथापि तुमचा विध्वंस होईल वो!
कार्याचा अवध्या, तुह्मां न यश ये जों काळ आह्मी जिवों."

बोले तैं ती—"जेविं वाटे, करावें,
जात्यें आतां काय होतें पहावें;
भीती वाटे, काय होईल अंतीं;
कैसे आलां सिंहिणीच्याच दंतीं!" १४०

तदा नृपकुमार तो कमलजेस बोले—"अगे !
सुधी कमलजा प्रिया असशि तूंचि ती काय गे,
जिचा मम पितामहा रणिं पिता असे रक्षक;
मशीं वळसि तूं जसा वळत दंशिण्या तक्षक! १४१

तुझ्या कुळिंचि काय ती सरलि पूज्य बुद्धी असे?
तुझ्या हृदयिं तीळही उरलि काय प्रीती नसे?
कशा तरि अशी अगे! वदशि वैखरी दुःसह,
जगास न रुचे असा मनिं धरूं नको आग्रह." १४२

बोलला पुढें बंधु तो तिला—
"नाहिं आठवे काय गे तुला,
एक ठायिं तीं कैशिं वाढलों?
बाळकें सुखें कैशिं क्रीडलों? १४३

एकमेक जीं दोन संगतीं
खेळ खेळलों प्रेमिं नांदतीं,
नाट सोंगट्या हास्यि आर्जवें
खेळलों; कसें तूज नाठवे. १४४

ज्वरभरादिकें अंग शोषतां
कधिं न भागली जीच कष्टतां,
उभि असे खडी राहिली अजी
वपु हरावया, प्राण-राखि जी! १४५

**साकी.**

कुरणिं गारशा शांत सकाळीं बहु फिरलों आनंदें,
वनीं उपवनीं गुंफुनि पुष्पें ल्यालों जीं स्वच्छंदें;
तूं ती भगिनी का। अजि मज धाडिशि यमलोका?"१४६

बोले मग तो तिज शशिवदन—"प्राण जोंवरी देहीं,
राहें तोंवरि तव चरणीं म्यां लेवुनि स्त्रीवस्त्रें हीं;
नित्य इथ रहावें, । तव चातुर्या परिसावें!" १४७

श्लोक.

"युग्म."

राजपुत्र तैं वदत तीप्रती—
"तूंच होसि का कमलजा ग ! ती,
लग्न लागतां सजुन नोवरी,
जावया जयीं निघशि सासरीं, १४८
बोललीस जी मत्पित्या स्वयें,
'सोडिलें तुह्मां आजि निर्दयें
म्यां जरी, तरी जाणिजे पुरें
अंतरीं तुह्मां इच्छितें बरें'. १४९

बोललीस तैं–'तूमच्च्या कुणी
गांवचें कुण्या वेळिं, कारणीं,
संकटीं पडे गांविं माझिया,
साह्य होइं मी वेळिं त्या तया.' १५०

साकी.

स्मरुनी भाषण तेंच तुझें गे आलों तुझिया द्वारा,
'संकटिं पडलां' ह्मणशी ऐसें, तरि दे आह्मां थारा;
आठविं गे उक्ती, । पुरवीं नृपतनयासक्ती. १५१

### श्लोक.

"विशेषक."

हरिणि दिवशिं एका सायकें पीडिलेली
पळत तुजशिं आली व्याकुळप्राण झाली;
बघुनि रुधिर तीच्या अल्प जें अंगिं वाहे,
ढळढळ रडलीशी, दुःख जैं तें न साहे; १५२
ती आज कोमळ कशी स्वकरें प्रकोपी
गर्वांध बंधुशरिरावर हस्त वोपी?
का बंधुची तनु तुला हरिणीहुनी ती
वाटे उणी? तरि असे अशि कोण नीती? १५३
होतीस केविं मधुरा, बहु सुस्वभावा!
नाहीं मला कळत कां अजि भेद व्हावा."
वाग्बाण तीक्ष्ण बहु हे हृदयांतराला
गेले तिच्या, परिसुनी कटु भाषणाला. १५४

### साकी.

मग शशिवदनें भाषण केलें?–"का तूं त्या बाळेची
माता असशी, बहु आवडती इथ जी सर्वत्रांची?"
तैं ती उत्तर दे, । प्रेमें गहिंवरलेलि वदे–१५५

### श्लोक.

"जळो हा मायेचा भ्रमवित पसारा मृदु मना!
असे वेडी माया, बहु पिडितसे सद्गुणि जनां,
स्वकर्त्तव्यालागीं कधिंहि तरि बाधा करितसे;
वसे प्रेमा जेथें, कठिण मन होई तिथ कसें! १५६
परी कां भ्यावें म्यां, सुकृत करण्यालागिं अपुलें?
स्वमातेच्या हस्तें बलि न चिलया काय दिधलें?
स्वदेहींच्या पिंडाहुनि भगिनिला का प्रियतर
असे भाऊ लोकीं? उगिच मग कां मी भिउं तर? १५७

न मत्स्वामीणीची शपथपर सेवा कधिं घडे,
जरी भाऊ रक्षीं, सहचरहि जीवंत इकडे;
अहा! कर्त्तव्याला स्वजनममता बाध करिते!
मला नाहीं आतां सुचत, बघत्यें काय घडतें. १५८
"करूं या," ह्मणे–"एक युक्ती क्षणीं या!
भल्या राजपुत्रा! प्रिया बंधुराया!
कचाट्यांतुनी म्यां तुह्मां सोडवावें;
तरी सांगत्यें, येथुनी शीघ्र जावें. १५९

**पद. रागिणी कानडा,—ताल त्रिवट.**

(ख्याल. राजा दुलारे—या चालीवर.)

आज–उद्यां तुह्मि येथुन जावें, मुकाल नातरि प्राणांतें;
जाल किं नाहीं तुह्मी बांधवा सांगा साचें ह्मणि मातें.॥ध्रु०॥
मंदमती त्या तिघिही होत्या, येत्या ना कधीं कामातें,
ऐसें सांगुन समजावूं त्या कांचननगरीमातेतें॥१॥ आज०
जा हो येथुनि, जीव वांचवा, आण घालित्यें तुह्मांतें,
उठवूं वदतां पळोनि गेल्या तिघिही आपुल्या ग्रामातें,
॥२॥आज० १६०.

**श्लोक.**

द्यावें म्यां तुज मृत्युला भगिनिनें, बंधो! घडे का कदा!
देहाचें नसतांचि भान वदल्यें, वाणी अशी दुःखदा!
हे बंधो! गृहिंचें मला कुशळ रे तूं सांग आतां प्रिया,
माता कैशि असे, कथीं; मन करीं तूं शांत;टाकीं भया". १६१
दाटे तैं मन कोंवळें भगिनिचें, भ्रात्या निहाळी, मुखीं
प्रेमें नेत्र भरूनि अश्रु गळले, होई मनीं ती सुखी;
हातानें धरुनी तया मणगटा, आलिंगिलें बंधुला
भेटाभेट दिसे किं शुक्र उदयीं भेटे नभीं इंदुला. १६२

एक्या ढाळिं गुलाब दोन फुलतां, सान्निध्य पावोनियां
त्यांच्यांतील सुसूक्ष्म भेद न कळे जैसा बघोनी तयां,
तैशीं सन्निध पाहतां, दिसति तीं तैं एकमेकांसम;
हा भ्राता ! भगिनी किं ही ! न समजे, ऐसा पडे तैं भ्रम !
१६३

आनंदाश्रू नयनिं भरुनी प्रेम-मूर्त्ती गळाले;
ऐकोनी ती स्वगृह-कुशळ-क्षेम, संतुष्ट डोले;
बंधुप्राणाऽपहरणवती बुद्धि सारी पळाली;
ब्रीदद्रोही बनलि, तिचि सत्कार्यनिष्ठा गळाली. १६४

साकी.

अशीं उभयतां बोलत असतां, एकमेक तीं प्रेमें,
देखे तिथ ती, शशिकलेची तनया मधुकरि नामें.
बाळा तिज बोले-। "माय निरोपास्तव आल्यें". १६५

श्लोक.

हंसत वदन जीचें, वेल जी कोंवळीशी,
नयन विकच पुष्पें ते जिचे तेजराशी,
मधुकरिअभिधाना शोभवी जी कुमारी,
उभि तिथ सुकुमारा राहि आनंदकारी. १६६

"युग्म."

पुसे कमलजा तिला, "सकळ काय गे भाषण
तुवां वद किं ऐकिलें ? तुज न देइं मी दूषण";
तदा मधुकरी वदे करुनि अंतरंगा खुलें,
"तुह्मां कथितसें खरें सकल भाषणा ऐकिलें; १६७
मनांत नव्हतें, परी जयिं उभी इथे राहिल्यें
वचा भयद तूमच्या पडत, कर्णिं या घेतलें;
क्षमा मज करावि हो, दिसतसें जरी आग्रही,
घडेल न कदापि कीं करिन गोष्ट षट्कर्णिं ही. १६८

नसे इच्छा माझ्या मुळिंच हृदयीं वा मम मनीं
असें कीं धाडावे नरवर तिथे मृत्युसदनीं;
अहो या वीरश्रीविजयभरल्यां दिव्य मनुजां
कसें तें हाणावें ? निजबळ असें कोठिल भुजां?" १६९

वदे तैं ती बाळेप्रति कमलजा—"हे प्रियसखे!
जरी ऐशी वाणी नसति ग निघाली तव मुखें,
तरी भीती कांहीं हृदयिं नव्हती, वा कधिं नये;
तुझे ठायीं आहे परम मम विश्वास सखये. १७०

परि तव मज वाटे, मत्सरी द्वाड माता—
ह्मणत अजि ग होत्यें—फार का बोलुं आतां—
दिससि सकल कामीं शाहणी नित्य जी तूं,
'ब्र' न कधिं मुखिं काढीं, जाय तैं सिद्धि हेतू." १७१

चाला बोलतसे—"चकार न मुखें येणार, हे शाश्वती!
कोणा वर्म न ही कथील रसना, काया असे जों जिती;
आला भूवरि ब्रह्मदेव जरि तो, जिव्हाग्रिं ती शारदा,
वाणी ना निघणार जी वदलिया होई जनीं दुःखदा". १७२

कमलजा तदा बोलली तिला—
"प्रभु समर्थ हो साह्य तो तुला!
सुचवुं संकटीं योग्य बुद्धिला;
सकल कार्य हें जाउ सिद्धिला!" १७३

"नको गे तूं आतां" शशिवदन बोले कमलजे
"नको आह्मां त्यागूं, पुरुषगण आह्मी निरत जे
स्त्रियांठायीं आहों; कळत मुळिं ना, स्त्रीजन जरी
मनुष्यां अव्हेरी, घडुनि कशि येई गत तरी." १७४

### दिंडी.

"वरें!" ऐसें मग कमलजा ह्मणाली,
गोष्टिखालीं अशि फार वेळ गेली—
"नीट वागा हो, थाट शोभवा तो,
सिद्धि पावेना अन्य मार्गें हेतो. १७५

### श्लोक.

माझी आहे हीच तुह्मांस सांगी,
बोला थोडें; फारशा एक जागीं
कोणासंगें बोलुं तुह्मी नका हो;
जेथें जेथें जाल तैं ऐक्य राहो." १७६

निघाले जायातें, तयिं शशि वळोनी उचलुनी
सुता घेई प्रेमें कटिं, कमलजेची कवळुनी;
धरी कीं बाहूशीं परमसुकुमारा कुमरिला,
रमोनी बाळेनें हंसत शशिचा गाल धरिला. १७७

चुंबिलें सुमुख मंजुळिचें तदा,
चुंबिल्याविण अशा सुमुखा कदा
पुरुष राहिल कोण, कसा तरी?
चुंबुनी तिज, विनोद बहू करी. १७८

तिघेजण तिथोन ते परतुनी निघाले सवें;
दुपारभर हिंडले ठिकठिकाणिं तेथें, नवे
प्रकार बघतां तयां बहुत हर्ष झाला मनीं;
बसोनि बहु विस्मयें पठण देखती स्त्रीजनीं. १७९

ऐका तिथें शिक्षण केविं देती;
भूगोल गोलांवर शीकवीती,
वर्तूळ रेषाकृति भूमितीच्या,
शिष्यांप्रती दाविति रीति साच्या. १८०

महाभारतांतील वाचूनि वेंचे,
स्फुट श्लोक बोधार्थ रामायणाचे,
तसे श्लोक ते रामदासी 'मनाचे'
करीती मनोरंजन स्त्रीजनांचें. १८१

समयसूचक तोषक ज्या ह्मणी,
चतुर योजिति नित्य सुभाषणीं,
वदुनियां कथि त्यांतिल मर्म तें,
सुगम जें गमलें तिचिया मतें. १८२

राजनीति, इतिहास पुरातन,
तर्क, कालगणना, भववर्णन,
तत्त्व, ज्योतिष, छंद, निरुक्तही,
न्याय, दाय, कथि चालत जैं मही. १८३

खग नग तरु पुष्पें वाढती कोण रीती,
जलचर पशु यांतें कोण कैशापरी ती
गति जननमृतीची, वर्णि ती सर्व साची;
परिसुनि युवतींच्या तृप्ति होई मनाची. १८४

विद्युत्प्रयोग करुनी मग दावियेले;
केल्या रसायनकृती तयिं दंग डोले
सारी सभा युवतिंची, बघुनी जगींच्या
आल्हाददायक चमत्कृति सर्व साच्या. १८५

जें जें शास्त्र असे सुगम्य मनुजां तें तें तिथे पाहिलें;
जें कांहीं उपलब्ध आजिवरि, त्या ज्ञाना तिथें वाहिलें
प्रत्येकीं मन आपुलें युवतिंनीं प्रेमें पुऱ्या आर्तिनें;
पाहोनी नर हें तिघेही रमले, तैं थक्क झालीं मनें. १८६

तिथे वृषभ गोठियांतुन सुटोनि रात्रौ जसे
फिरोनि कुरणीं, तृणें भरिति पोट स्वच्छंदसे,
तिथेहि तसियेपरी, फिरुनि पाठशाळेमधीं
यथेच्छ उपभोगिती विविध भोग ज्ञानांबुधीं. १८७

### दिंडी.

चंद्रकेतु वदे तदा तो–"बघा ! या
काम चालविती स्वयें सर्व बाया
पूर्ण ज्ञानें, चतुराइनें, सुनीती,
बहू प्रेमानें, नरांचिये रीती!" १८८

### साकी.

शशिवदनानें उत्तर केलें ऐका राजसुताला—
"स्थापिलि शाळा काय त्यामधीं पुरुषार्थचि तो झाला?
नाहीं का बाया। शिकविति बाळां गृहिं आया? १८९

### श्लोक.

उच्छिष्ट[1] पात्रें असती स्त्रिया या;
शक्ती नसे शोध नवे कराया;
केलें कुणीं कांहिं तया विधानें,
तें त्यां करूं ये बहु शिक्षणानें." १९०

---

१ स्त्रिया "उष्ट्या पत्रावळी" अशी मुंबईकरांत म्हण आहे; म्हणजे त्यांच्यांत आपण होऊन कांहीं नवी कल्पना काढण्याचें सामर्थ्य नाहीं; तर, कोणी पुरुषांनीं कांहीं केलें तसें त्याचें अनुकरण मात्र करण्याचें काय तें सामर्थ्य आहे; अर्थात् हें वाक्य परम निंदास्पद आहे असें समजावयाचें.



"धिक्कार मूर्खा तव वल्गनांतें !"
संतप्त बोले कमलाक्ष त्यातें;
"त्वज्ज्ञान वृद्धीस न पावलें का,
व्याख्यान हें ऐकुन आजि लेंका?" १९१

"कसा 'नाहीं' बोलुं"–शशिवदन बोले–"वद भलें?
अरे व्याख्यानातें परिसुनि खरें ज्ञान दुणलें;
निमेषामाजी मी सकळ शिकलों जें कमलजे–
मुखावाटे, तें ना युगिंहि शिकतों, पूर्ण उमजें. १९२

प्रसिद्धां शास्त्रांचें परम अजि तें दैवत जरी
शिरीं माझ्या ओती प्रिय निजकरें शास्त्रहि, तरी
मला वाटेना कीं मजशिं मिळतें ज्ञान इतुकें;
कधीं लाभे कोणा, परिसुनि मिळे आजि जितुकें? १९३

परी बघ इथे किती, सुहृदयें कशीं कोमळ,
अशा अवनिं राहुनी नगरिं या कुबुद्धीमळ
पदोपदिं हळूहळू करिति नित्य तीं सेवन;
अभाव नरमैत्रिचा बहुत दूषितो स्त्रीजन. १९४

अरे उपजला असे बहुत लोभ माझ्या मनीं,
दिसे न दुजि सुंदरी प्रिय अशी मला या जनीं,
गमे वरुनियां तिला, सकळ सौख्य संसारिंचें
निवांत उपभोगितों, परि न लग्न येथें रुचे. १९५

किती सुरमणीय या दिसति ज्ञानभोक्त्या स्त्रिया !
किती सुगुरुमायि त्या मनविहारि शिष्यप्रिया !
कितीक समयीं मला नटवि थाट हा वाटला
अयोग्य ! गमलें स्त्रियां पुरुष दाखवावा भला ! १९६

ऐशी ही कृति ना परी मुळिंच ये कामास या मंडळीं,
ओढाताण करोनि नारिरव[1] तो या आणिलासे गळीं;
प्रार्थूं या नटनायका, कधिं न हीं सोंगें कळावीं स्त्रियां,
स्त्रीवेषी बसुनी तयांमधिं सदा प्रेक्षीतसावें तयां. १९७

दिंडी.

पुरी होतां ही उक्ति त्या शशीची,
वेळ झाली मध्यान्ह-भोजनाची;
भोजनाच्या मंडपीं येउनीयां
जागिं बसली एकैक आपुलीया. १९८
तिथहि एक्या स्थळिं बैसलें त्रिकूट;
नाहिं झाली कधिं—होइ कशी?—फूट;
दाट शोभे तो थाट स्त्रीजनाचा,
रंग पाटांचा ताट—वाटियांचा. १९९
अन्नदात्याला प्रार्थुनी मुखानें,
एकघोषें मांगल्य गीतगानें,
देवि तोषविली, अन्न सेवियेलें,
षड्रसान्नें रसनेस तुष्ट केलें. २००

साक्या.

भोजनसमयीं शशीकलेचे त्रिकुटावरति कटाक्ष
दिसोनि आले, परी त्रिवर्गें केलें तिथ दुर्लक्ष;
जणुं का सिंहिण ती, । रानीं पाडस निरखीती. २०१
भोजन झालें; तांबूल मुखीं सेवुनि फिरण्या जाती;
कोणी उपवनिं, वनिं हिंडूनी पाठांतर करिताती;
ऐसें मंडळ तें । हर्षित क्रीडा सुखि करितें. २०२

---

१ स्त्रियांचा आवाज.

कोणि पडावीं बसुनि नदीवर उल्हासें त्या तरती,
कोणी चारेवर पडती, कुणि चढती वृक्षावरती;
ऐसें मंडळ तें । हर्षित क्रीडा वनिं करितें. २०३
कोणि मयूरासंगें खेळति, उडविति कारंजांतें;
स्त्रीवेषी परि बैसुनि एक्या स्थळिं बघती मौजेतें;
मिसळुनि जरि जाते, । वळखलें तरि तें त्यां असतें. २०४

**पद. राग, देस. ताल त्रिवट.**

कलिया भीनन जाय–या चालीवर.

सुमनें वेंचित जाय; कुमारी तीनसांज वेळीं ॥
सुमनें वेंचित जाय. ॥ ध्रु० ॥
कुसुमें वेंचुनि उभी ठाकली, । शोभे सुंदर नार;
प्रेमा मनिं त्या राजकुमारा उठे, नवल तें काय? १
सुमनें०. २०५.

**श्लोक.**

सायंकाळ समीप येउनि जयीं व्योमीं सतेज ग्रह
सौंदर्यें गगनास शोभविति ते होवोनि सौख्यावह,
निद्रास्थानिं प्रवेशती युवति त्या साऱ्या सुवेळीं तया,
देवी प्रार्थुनि जागजागिं पडती निद्रा सुखें घ्यावया. २०६
ज्ञान वेंचतां श्रांत जाहल्या,
झोंप घ्यावया सर्व चालल्या;
देविमाय ती आठवोनियां
मागती—"करीं माय गे दया! २०७
कार्य जाउं दे सर्व सिद्धिला;
देइं गे बळा शुद्ध बुद्धिला;
स्त्रीजनांस तूं देइं गे यशा;
स्त्रीजनीं असे झालि दुर्दशा!" २०८

**सर्ग दुसरा समाप्त.**

---

# संवादनामक सर्ग तिसरा.

श्लोक.

सहस्त्ररश्मी उदयासि आला,
प्रभंजनें बाष्पतुषार गेला,
प्रमोद झाला पशुपक्षियांला,
प्रसन्न ते जाति चरावयाला. १
कारंजियांचे उडती फंवारे,
लता तरूही नवपुष्पभारें
शोभा वना देति सुरम्य सारीं,
रंगें खुले अंबर तोषकारी. २

दिंडी.

तिघे होउनियां उषःकाळिं जागे,
(भयें निद्रा त्यां पूर्ण कैंचि लागे?)
ईश प्रार्थुनि मुखमार्जनादि केलें;
आपअपुलें स्त्रीवसन शुद्ध ल्याले. ३

श्लोक.

जिथें कारंजांचें उडत जळ होतें सभवतें,
उभे होते बागेमधिं तिथ तिघे एकवट ते;
तुषारा पाण्याच्या निरखिति बहू ते सुखि मनीं;
तदा आली बाळा मधुकरि तिथे म्लानवदनी. ४
नसे निद्रा डोळीं अखिल तिचिया रात्रभर ती;
तिघां पाहोनीयां खळखळ तिचे अश्रु गळती;
भयानें चिंतेनें, सकल तनुला कंप सुटला,
मुखावाटे ये ना ध्वनि मुळिं, असा कंठ सुकला. ५

साक्या.

यत्न करुनि परि मधुकरि बाळी राजकुमारापाशीं
घाबरलेली उभी राहिली, लागे धडक उराशीं.
बोले गहिंवरली, । "मित्रा ! भ्रांति मला पडली!" ६
"धांवा धांवा !" ह्मणे सुबाळा "माता माझी जाणे
कोण असा तुह्मि, काय कारणें झालें तुमचें येणें.
आहें अपराधी, । मागें 'क्षमा करा आधीं' ७
येथुनि जा हो, नगरी सोडा, तुमचें कळलें वर्म;
निज गुह्याचा घडा फोडिला, केलें अनुचित कर्म !
झाल्यें अपराधी, । कथितें 'क्षमा करा आधीं.' ८
हातुनि माझ्या गोष्टचि गेली, झाली षट्कर्णीं ती;
मित्रद्रोही ऐशि काळिमा, मजवरती हो आली !
आहें अपराधी, । तरि हो क्षमा करा आधीं. ९

दिंडी.

असे मातेची चाल माझिया कीं
जरी कोणी ये नवी नारि-लोकीं,
माय इच्छी तैं वर्गि तिच्या जावें;
कमलजेला सर्वांनिंही त्यजावें. १०

श्लोक.

स्थापीली नगरी जयीं, अंवतिलें ते काळिं, कीं इंदिरा
राणी या नगरीं असावि; तिच्चिया सव्यापसव्या करा
मन्माता जशि तेविं ती कमलजा व्हाव्या समप्रीतिच्या;
आतां ती प्रमुखा प्रिया कमलजा झाली मतें राणिच्या. ११

### दिंडी.

असा येथें क्रम उलट चाललाहे;
नवी येतां जी कमळजेस पाहे,
कमळजेच्या ती वर्गि जात आहे;
हेंचि माये माझिया मुळिं न साहे. १२

### श्लोक.

बोले माता, 'येइ जी, तेथ जाई;
झाली ती या कांचनीं गोड आई !
मातें कोणी काय नाहीं पुसावें ?
होई जें जें, पाहुनी तें असावें.' १३
करिति माझि ती माय दुर्धरा,
कमळजेचिया नित्य मत्सरा;
बसुनि, रात्रिं ती चौकशी करी–
'कुठुनि पातलां या तुह्मी पुरीं'. १४
बोले 'कशा या, किति भव्य बाया !
धेंडांप्रमाणें दिसतात काया !
भारी मला भासति दांडग्या या,
माझ्या नको सन्निध ह्याचि बाया.' १५
'स्वदेशभगिनी तिघी' कमळजा असें सांगत्ये;
'तिच्या तिजचि शोभती; मज नको, न मी मागत्यें'.–
असें वदलि तैं मुखीं पळसपुष्पतुल्यप्रभा
दिसे; भुजग तो मनीं भगिनिरोष राही उभा. १६
ह्मणे मजशि माय ती–'त्यजितसे असा कासया
कपोलिं तुज रंग हा; गमत कीं न या गे स्त्रिया;
कशा क्षणिंच गे अशी फिकट होशि सांगें मुली ?
असे विदित काय गे कुठुनि हीं इथे पातलीं? १७

कशा इतुकि लाजशी; वद किं ठाउकें जें असे.
स्त्रिया असुनि दीसती पुरुषरूपि ऐसें कसें?
असेचि तुज ठाउकें दिसतसे तुझ्या गे मुखीं—
तिघे पुरुष–साच हें–कमलजा तयांची सखी. १८

समागमिं तिघांचिया प्रहर होति ती बोलत;
मुली! मजशि सांग, गा! असशि काय त्या जाणत.
कशा लपविशी अगे, कळतसे मला स्पष्ट जें ?
नको मजशिं सांगुं तूं–कपट तूज हें ना सजे.' १९.

शब्दीं ना वदलें; मुखावरुनि तें आलें कळोनी सवें
होतें घोळत काय अंतरतळीं—साऱ्यां न जें जाणवे—
ऐशी ज्ञानलता प्रचंड वनिता माता मदीया मला
माझ्या बुद्धिस नाडुनी, हृदयिंचा तैं व्याळ तो जाणला. २०

प्रातःकाळिं उठोनि ती कळविण्या हें वृत्त त्या इंदिरे
गेलीसे; नकळे मला अजि कसें होई, बहू घाबरें;
सर्वस्वीं बुडली असे कमलजा, झाला तिचा नाश हो;
जा येथून सवें, जिवा तुमचिया केशाग्रिं पीडा न हो! २१

गेल्याअधीं हो मज पापिणीला
व्हावी क्षमा, म्यां अपराध केला;
कैसें तुह्मां या वदनास दावूं ?
कीं आग वाटे तनुलागिं लावूं". २२

दिंडी.

तदा शशिवदनें प्रश्न तिला केला,
हंसत बोले करिं धरुनि सुंदरीलाः
"काय भाषण गे करिशि मधुकरी हें ?
काय केली कृति अशी तुझ्या देहें? २३

नको कांपूं गे, नको गार होऊं,
तुझ्या बदली हे स्वयें प्राण देऊं;
काय ऐसें निस्तेज तुवां व्हावें !
तुझ्या तोंडा म्लानत्व कसें यावें ? २४
नको खेद करूं, क्षमा हवी काशा?
निरपराध्याला कोण करी शिक्षा?
मायसंगें बोलतां म्लान झालें
वदन, ह्मणुनी का तुवां पाप केलें ? २५

### श्लोक.

ऐशा या नगरींत कांहिं दिन, गे ! आह्मीं वसावें गमे;
इंद्राच्या भुवनांतरीं मन न हें ऐसें कदाही रमे;
जाऊं या नगरीस सोडुनि, तरी पावूं फजीतीप्रती;
वैकुंठीं वसत्या जशी यमपुरी, होईल तैशी गती. २६
शशिकलेस या प्रार्थना करूं,
दिवस कांहीं हें नाट्य निस्तरूं;
जरि वळे, तरी सर्वकामना
करिल पूर्ण ती, किंतु ना मना. २७

### दिंडी.

द्रवहि पाषाणा येइ विनवणीनें;
काय अंतर तें, द्रवे न वाणीनें ?
कार्यभागा या करावया जातों,"
असें बोलुन शशि शीघ्र तैं निघे तो. २८

श्लोक.

कमलाक्ष बोले, "वद केविं, बाले!
प्रमुखींमधीं भांडण काय झालें."
मनिं मोकळ्या ती वदली सुबाला—
"बहु भांडणा काळ असेचि झाला. २९

अहो द्वैत हें आंतुनि फार दीस
असे माजलें; तें दुणे मास मास;
असे माय माझी बहु द्वेषकारी,
तयीं अंत ऐक्यास ये दुर्विकारी. ३०

अहो भांडणारी असे वारियाशीं,
ह्मणे पूर्ण होता पती मौर्ख्यराशी;
नसे पाहिलें म्यां कधीं बापड्याशीं,
बहू सोसतें आइच्या जाचणीशीं. ३१

इंदिरा तिच्या हातिं वाढली,
इंदिरेचि जैं माय वारली;
आलि तूमची जैं सहोदरा,
मानि तीजला श्रेष्ठ इंदिरा. ३२

---

१ या श्लोकाचें वृत्त नवें असून, तें साहजिक पडलें आहे. याला **इंदिरा वृत्त** अशी संज्ञा दिली आहे.

याचें लक्षण—पादाक्षरें १२;

गण—स, य, स, य.

मात्रा येणेंप्रमाणें:—

⏑ ⏑ – | ⏑ – – || ⏑ ⏑ – | ⏑ – – ||

या वृत्ताचे आणखी कांहीं श्लोक पुढें आले आहेत.

एक्या भावें एक चित्तें स्त्रिया त्या
सख्यानें या ग्रामिं राहात होत्या;
बोले जें जें एक त्या नित्य दूजी
हो हो बोले सर्वही कामकाजीं. ३३
कार्याकार्यीं नित्य एका मतानें
चाले सारें, दोघिंच्या विद्यमानें;
मन्माता ती मत्सरीं अंतिं बोले,
येतां स्पर्धी वैभवा सर्व नेलें. ३४
वदे माता ऐसें—'सकल युवतींतें कमलजा
स्ववर्गीं नेवोनी, उपजवि तयां चित्तिं समजा,
स्थळीं अन्या जातां बिघडतिल कीं कोमळ मनें;
असें चोरीयेलें मन सकळिकांचें कपटिनें. ३५
कमलजेप्रती ऐशिये रिती
दुरितयुक्त हो माय माझि ती
परम निष्ठुरा शब्द लाविते,
तिजचि ही तिची उक्ति शोभते. ३६

साक्या.

आतां जातें; वेळ जाहला, राहुनि येथें, भारी"—
ऐसें बोलुनि धांवत गेली बाळा मानसहारी,
जशि का चिडि उडली, । झडकर सुखकरि ती गेली. ३७
कमलाक्ष तिची गति न्याहाळुनि बोले "धन्या बाळा,
वरणें जरि तरि अशिच वरावी सच्छीला वेल्हाळा;
आहे गोड किती ! । शुद्धा केवीं ही चित्तीं. ३८
मदांध किती ती पहा इंदिरा, गर्वामाजि बुडाली !
कमलजाहि ती अशा स्त्रियेची दासी पूर्णचि झाली.
बाळे जोड नसे, । मधुकरिसम इथ कोण दिसे?" ३९.

परिसुनि ऐसें राजपुत्र तो बोले निजमित्राला—
“योग्य तुझा हा विचार मित्रा ! मान्य मला तो झाला;
बाळा गोड असे, । ह्मणशि जें तेंचि यथार्थ असे. ४०

श्लोक.

जसें भावे तैसें वदसि कमलाक्षा घडिस या;
जया जैसें वाटे, निवडि वधु तो पारखुनियां;
मला साऱ्यांमाजी प्रियकर गमे राजतनया;
जरी एका नादें भ्रमलि, तरि ती ग्राह्य हृदया. ४१

चातुर्यबुद्धी प्रचुरा किती ती !
ऐसा पसारा घडवी स्वहस्तीं !
स्त्रीउन्नतीची धरि चित्तिं आशा
छेदावया स्त्री-जन-दास्य-पाशा. ४२
शतपंडितां जिंकित जी प्रसंगीं,
शतयोद्धियांचें बळ शौर्य अंगीं,
शतभास्करांचें शिरिं तेज शोभे,
पिडलों अशा सुंदरिचेनि लोभें[१].” ४३

दिंडी.

असें बोलत अंगणा सोडियेलें
त्रिवर्गानें; मग गच्चिवरी आले;
संगमर्वरि खांबाशिं उभे ठेले,
उत्तरेचा जिथ वायुवेग चाले. ४४
गंध केतकिचा जाइच्या वनींचा
करी सुदुनी संतोष मानसाचा;
गुलाबांच्या परिमळें व्योम कोंदे,
बारमासहि जें पुष्प बागिं नांदे. ४५

---

१ इंदिरा वृत्त श्लोक २ रा.

साकी.

शशिवदन तिथ आला तेव्हां, श्रांत बहू झालेला,
हस्तद्वय मस्तकिं ठेवुनियां आळस तैं टाकीला,
बोले–"कठिण घडी, । नाहीं शशिकले जोडी. ४६

दिंडी.

पर्वताचे खोदितां ढीग येती;
येति तोडीतां घोर अरण्यें तीं;
लोह बाहुबळें वळवितांहि येई,
वळेना ही पाषाणरूप बाई. ४७

श्लोक.

शशिकलेचि त्या भेट घेतली,
अति विनम्र म्यां भीक याचिली–
'उघड हें कधीं कृत्य आपुलें
करुं नये'–असें तीस प्रार्थिलें. ४८
युक्तिप्रयुक्तीं मधु भाषणानें,
प्रत्येक शब्दीं बहु आर्जवानें,
आराधिलें म्यां जणुं देवतेला,
कीं हा टळो आजि अघोर घाला. ४९
तैं शोध केला जन कोण आहों,
कोठें असों जात, कुठेंचि राहों,
योजूनियां काय मनांत आलों,
हा वेष कां आपण येथ ल्यालों. ५०
कथिलि सकळ वार्त्ता साग्र, झाली असे जी;
परिसुनी निजगुह्या जाहली नाहिं राजी;
मग जयिं तव लग्ना योजुनी प्रश्न केले,
चढवुनि भ्रुकुटींतें, विस्मया दावियेलें. ५१



आवेशानें बोलली हें मला ती—
'जें जें बोलां, गैर तें सर्वरीती;
स्त्रीमंदीरीं पातलां गैर केलें;
स्वप्राणांतें कांटिया लावियेलें.' ५२
उद्देशूनी बोललों द्वारलेखा—
'उल्लंघीली आह्मिं बुद्ध्याच रेखा;
जें त्या योगें ये घडोनी घडो तें;
पाहूं स्त्रीच्या हातुनी काय होतें. ५३
इथे आह्मी आलों समजुनि मनीं पूर्ण—' वदलों—
'बळी द्यावा लागे, ह्मणुनि मरणा पात्र ठरलों;
जिवें आह्मांलागीं जरिहि तुह्मि माराल इकडे,
तरी कार्याचे हो सकल तुमच्या होति तुकडे.' ५४

दिंडी.

'अणिक तुकडे हो काय व्हावयाचे?
दिसे'—वदली ती—'चिन्ह हो भिकेचें,
शत्रु शिरले नर दिव्य नगरिमाजी;
काय तोटा होणार अधिक आजी! ५५.

श्लोक.

असे काय नाशास आतां उणें तें;
इथे पक्षपातें सदा काम होतें.'
तदा मी वदें—'हें नको राजबाळे
कळों वृत्त देऊं स्वयें आयकीलें. ५६
नको फोडूं गुह्या; सकळ कळल्या राजतनये,
अहा बट्टा मोठा तव मधुकरीलागिं उगि ये;
असोनी ठावें कीं नर असुं, न ती बोलिलि परी;
अशी कां पाडावी मुखिं सकळिकांच्या मधुकरी? ५७

'तुह्मां काय त्याचें'–मला बोलली ती—
'तयाची मला काळजी सर्वरीती;
नसाव्या तुह्मांलागि पंचाइती या;
स्वधर्मास जाणें, स्वकर्मे कराया.' ५८
मग बोललों मी–'जरि इंदिरेला
अजि हाचि वृत्तांत कळोनि आला,
करूं आह्मि संग्राम बळें स्थळीं या,
हरूं इंदिरेला, धरूं जिंकुनीयां. ५९

साकी.

कितीक जातिल प्राण हरोनी, होइल नाश जिवांचा,
नगरींच्या गे विध्वंसानें लय होइल कार्याचा;
समजा हेंचि मनीं, । हांसें होइल सर्व जनीं.' ६०

श्लोक.

ती बोलली–'जें रुचतें करावें,
संग्रामिं, कीं हो कपटें धरावें,
या राजबाळेस बळें वरावें,
दासीपरी नित्यहि वागवावें. ६१
परी धर्म माझा न मी त्यागिणार;
घडो जें घडे, इंदिरे सांगणार
तिघांनीं जगीं या किं कापट्य केलें
इथे भेदियांचें तयां साह्य झालें," ६२

---

१ इंदिरावृत्त श्लोक ३ रा.

ऐकोनी तिचि उक्ति यापरि जरी सारीहि आशा गळे,
सोडीलें मुळिं आर्जवा तरि न म्यां, संकल्पही ना ढळे;
जैसें तें पय थेंब थेंब पडुनी पाषाणही भेदितें,
काळें जातिल वाटलें हृदिं तिच्या माझे तसे शब्द ते. ६३

ह्मणोनी युक्ती म्यां लढविलि गमे योग्य समयीं;
ह्मणालों 'बाई गे! घडिभर धरीं धीर हृदयीं;
नको होऊं ऐशी निरवधि उतावीळ युवती!
अगे ऐकें वार्त्ता, निजमन करीं शांत सुमती! ६४

श्रामा सुंदरशा उपस्थित तुवां केलें अर्धी या जरी,
आरंभीं जरि मुख्य तूं, हळु हळू झालीस गे दूसरी;
आतां झालिस सांगती तिसरि तूं, त्याहूनिही गे लघू
नीचत्वा किति पावशील, तुज ना ठावें, पुरें हें बघूं. ६५

ऐकें गोष्ट अगे! तुला विनवितों, उच्चा पदातें तुला
नेऊं, यत्न करोनि आह्मि, जरि तूं पोटीं स्वयें गोष्टिला
ठेवोनी, अमुचा त्रिवर्ग नगरीं राहूं सुखी देशिल;
मित्रातें वरि इंदिरा, जरि घडे, तो गे! तुला तोषिल. ६६

बांधोनी तुज देउं स्त्रीपुर अगे अन्यत्र विस्तीर्णसें,
कीं नाहीं कधिं कोणिं जन्मि अपुल्या कल्पीयलेंही असें;
तेथें राज्य अखंड तूं करिशिल, प्राज्ञा कुणाची असे?
कीं येवोनि कुणे रितीं छळिल गे तूतें कदा राजसे'. ६७

परिसुनि वचना या माझिया स्तब्ध झाली,
तिज फुस दिधली जी, ती विचारास आली;
मनन करुनि मातें बोलली शांतवाणी—
'उतरत दिन भेटा, शब्द काढा न कोणी'." ६८

साकी.

शशीकलेच्या भेटीचें हें शशिवदनानें केलें
वृत्त निवेदन, इतुक्यामाजी तिथ आमंत्रण आलें;
दासी उभि राहे। बोले—"राणि तुह्मां बाहे. ६९

श्लोक.

अद्रि जो वसे उत्तरेकडे,
नीर शुद्ध ज्या बाजुंनीं उडे,
मौज इंदिरा तेथ दाविण्या
ने तुह्मां, तरी जावयास या". ७०
हा निरोप त्यां दासि सांगुनी,
आंवती तदा सर्व कामिनी;
नेमल्या स्थळीं, काळिं योजिल्या,
सर्व नारि त्या सिद्ध जाहल्या. ७१
कुमारें जयीं इंदिरा पाहियेली,
अती शुभ्र साडी स्वयें शुद्ध ल्याली,
उभें प्रेम राही तिच्या कारणें तें,
प्रिया जाहली जी बहू काळ त्यातें. ७२
मग सर्व घोड्यांवरि बैसुनीयां
सजल्या स्त्रिया त्या निघतात जाया;
शिरिं पर्वताच्या अवघ्या चढाया
करिती तयारी, किति धीट बाया[1]! ७३
कुणि एकटी जाय, न संगतीला
दुजि घे; सवें घे कुणि मैत्रिणीला;
निज अश्व नेला कुंवरें सकाम,
तिजसंगिं जी त्यास असे विराम[2]. ७४

---

१ इंदिरा छंद श्लोक ४. २ इंदिरा छंद श्लोक ५.

तिच्या सांगातें त्या परम विनयें राजकुंवरें
तुरंगा ठेवीलें जवळ तिचिया बाजु निकरें;
असा साऱ्या मार्गीं तिज निकट चाले गजगती;
मनीं ईर्षा ही कीं कळवुं तिजला मानसरती. ७५[1]

वदली तया ती "तुमच्या सखीला
झिडकारुनी म्यां अवमान केला;
तर्यि दुःख वाटे जरि कां तुह्मांला,
समजा तसा खेद मलाहि झाला." ७६

## दिंडी.

"नव्हे मैत्रिणिचा"; कुंवर बोलियेला—
"परी त्याचा अवमान असे झाला,
गोष्ट ज्याची म्यां कथिलि आपणाला,
मागताहे जो आपुल्या कराला. ७७

### पद जिल्हा झिंजोटी. ताल त्रिवट.

(वस्त्रानें देह सारा—या चालीवर.)

चंद्रकेतु रविवंशीं कुळभूषण शोभतो,
लग्नाला योग्य तुह्मी, हे इच्छा वाहि तो;
नगरिंच्या नारि त्याच्या, आह्मि तया जाणतों;
जोडपें दोघांचें हो, बहु शोभेल मानितों. ७८

## श्लोक.

बोले तदा त्याप्रति राजबाला—
"ही पाहिजे गोष्ट पुन्हा कशाला ?
दासी किं आलां मज मागण्यातें ?
सांगा पुरें कायचि एकदा तें." ७९

---

१ इंदिरा छंद श्लोक ६.

दिंडी.

काय बोलावें अशा हो प्रसंगीं ?
राजतनयें कीं स्वयें ऐन रंगीं
रूप दाउनि आक्षेप तो वदावा,
विवेकानें वा धीर कीं धरावा ? ८०
असे त्याच्या मनिं बहु विचार आले;
गिळत चावत मग इंदिरेसि बोले–
"असे ओळख त्या राजकुमाराची;
गोष्ट जाणें मी लग्न योजिल्याची. ८१
जसा मानी तो, तशा पूर्ण आहां;
गर्क होइल तो देह पाहतां हा !
जरी ऐके आपुल्या मानसाला,
अंत आणी तरि स्वयें तो जिवाला." ८२

श्लोक.

"दीन बापडा !" वदत इंदिरा–
"मानिती खुळा असलिया नरा;
नाद तो फुका धरुनियां मनीं
घे करोनियां हसवणें जनीं. ८३
नसे काय विद्या कला ज्ञान त्यातें ?
कशा गांजवी आपुल्या तो जिवातें ?
न कां ज्ञानसंपादनीं काळ घाली ?
अगे ज्ञान ये कामिं तें सर्व काळीं. ८४
न कां शूरवीरांपरी आयु लावी ?
असे अंगिं जें तें जना शौर्य दावी ?
जरी बाइलेच्या पडे नित्य घोरीं,
गमे बाइला तो असे निर्विचारी." ८५

धिक्कारयुक्त वदली—"तुमजें विवाहा;
ना अर्पिणार कवणा कधिं याचि देहा;
कां स्त्री-जनें चुकुनियां निजजीवनातें
द्यावें नरा सकळही मुकुनी सुखातें ?" ८६

तदा वदे तो तिज राजपुत्र—
"स्त्रिया कधीं होतिल का स्वतंत्र ?
प्रचंड हें काम करीं धरीतां,
शिरीं असा भार कशास घेतां ? ८७

अखंड जो मार्ग असे प्रचारीं,
तया तुह्मी पाडितसांचि हारीं;
जरी असे योग्य विचार, सारा
कसा तडी जाइल हो पसारा ? ८८

"युग्म"
जरी हें तुह्मां हातुनी होय सारें
बहू युक्तिनें, योग्य बुद्धिप्रकारें,
न जाणों तुह्मांमागुनी ज्या सुनारी
कृती चालवायास येती नरारी, ८९
कसे रीति त्या, कोणच्या बुद्धिमानें
कृती चालवीतील कोण्या मनानें,
न तें सांगतां आजी ये हो कुणाला;
असो ही तरी काळजी आपणाला. ९०

जगीं जें बरें सर्व वेंचूनि घ्यावें,
ह्मणोनी अलभ्याप्रती कां झिजावें—
महत्कार्य तें कां जरी स्वीकरावें,
तरी पूर्ण तें हो स्वयेंची करावें. ९१

जरी आयु होई पुरें ना तयाला,
तरी योग्य द्यावें करीं तें दुज्याला;
दिसे ना कुणी येथ दूजी अशी कीं
करी आपुल्यापाठिं हें कृत्य लोकीं. ९२

"युग्म"
जसें पावला वाळुमाजी बघावें,
जसें सागरापृष्ठिं लेखा लिहावें,
ढगावारिया हातिं घेण्या पहावें,
जसें अग्निमाजी तृणा नीवडावें, ९३
तशि कृती इथ मांडियली असे,
उघड आचरणें इथच्या दिसे;
बघुं कृती किति हो दिन ही चले;
नरसुखावरि खड्ग धरीयलें. ९४

न जाणों हो काळेंकरुनि तुमची नूतन कृती
तुह्मांपाठीमागें झणि सकल पावेल लय ती;
अशा कृत्यें वाढे जरिहि तुमची कीर्ति जगतीं,
तरी सौख्या देखा कितिक युवती येथ मुकती. ९५
स्त्रियां बहुत जें असे प्रिय, सुकाल साऱ्या तया-
मुळें, सुखद संपदा, बहुत गोड जीं सारियां,
इथे कुठुन वाढती? पृथिवि काय ती देइल?
लतातरुवरी फुलें फुलति तेविं का येतिल? ९६
न होती लग्नें जैं, तिथ उगम बाळांस कुठला?
गृहाच्या सौख्याचा प्रमुखचि झरा एक सुकला;
अहो आयुष्यीं का प्रियतर असे बालकसम-?
हंसावें, खेळावें, इतर वळखी तें, न नियम. ९७

सदा आनंदानें पहुडत असे पाळणिं सुखी;
जसें वाढे, तैसें मधुवचन बोले मधुमुखीं;
पडे, रांगे, लोळे, दुडदुड कसें धांवत असे !
कसें हाका मारी जनकजननींतें मधुरसें !" ९८

ह्मणे राजबाळाः—"पुरे वल्गना या;
न का लाज वाटे इथे हें वदाया ?
मतीहीन तूं शुद्ध आहेस भासे,
भले मोतिदाणे मुखें येति खासे ! ९९

भली धीट तूं गे; न कोणीहि दूजी
कदा बोलली, बोलसी गोष्ट तूं जी;
परी सत्य आहे, अगे लेंकुरांची
असे आवडी पूर्ण आह्मांसि साची. १००

पद जिल्हा झिंजोटी—ताल त्रिवट.

("वस्त्रानें देह सारा" या चालीवर—)

मधुर हीं फार आह्मां आवडती बाळकें;
निर्मिलीं सौख्यकार्यीं जगताच्या पाळकें;
मधुरवचें मृदुहास्यें पितरां तीं तोषिती;
लालित्या अंत नाहीं, गृहसुख सदा पोषिती. १०१

श्लोक.

करावें तया आवडीलागिं काय ?
नसे आमुचे हातिं कांहीं उपाय;
न कां बालकें हीं स्वयें सिद्ध होती ?—
वनींच्या तृणासारखीं जन्मि येती ? १०२

जरामरण त्यांप्रती भवनदींत बाधा करी;
क्षणांत सुख जातसे, जरि तयांस मृत्यू हरी;
अगे सुखद पूर्ण तीं, जरिच वांचती लेंकुरें;
अकाळिं गत जाहल्या, जननिसौख्य कैंचें उरे? १०

अगे हे विषाचे बहू गोड गोळे–
मुलें पाहतां धन्य होतात डोळे—
परी सौख्य देती कितीकांस सांग;
किती पुत्रशोकें हृदीं होइ आग ! १०४

किती बाळकें होति हीं दुःखकारी,
दुराचार त्यां लागतां दुर्विकारी!
कसा आइचा होइ तैं आसभंग!
कसें विंधतें तैं तिचें अंतरंग! १०५

मुलांपायिं लागे किती काळजी ती!
मुलांची असे केवढी घोर भीती!
मुलांपायिं कैसा पतीपत्निमाजी
बखेडा पडे, येइ दोघांस लाजी! १०६

नको बाळकें तीं; नको घोर त्यांचा;
नको दुःखजंजाळ त्या गे ! नरांचा;
क्रिया आमुची ही असे सौख्यदायी;
जगीं मुक्त होऊं अशा गे उपायीं. १०७

न गे लौकिकासाठिं हें काम हातीं
धरीलें; नसे आस आह्मांप्रती ती;
असे पेरिलें बीज तें योग्य जागीं;
निघे वृक्ष जो, वाढवूं त्याजलागीं. १०८

कधीं ती फळप्राप्ति होईल, होवो;
उभारीयलें कृत्य त्या श्रेय येवो;
मुळारंभिं कोणी तरी पाहिजे तें
श्रमाया, तरी श्रेय यत्नेंहि येतें. १०९

सहस्र वर्षे जरि वांचलें मी,
चिंता असे काय, अशा सुकामीं
माझेंच ना मीं फळ पाहियेलें?
आरंभिलें कृत्य, कृतार्थ झालें. ११०

आयुष्य मी वेंचिन या सुकृत्या;
जें दुःख स्त्री भोगि, हरीन मी त्या;
ज्या आमुच्या मागुनि येथ येती,
ही चालवीतील कृती सुरीतीं. १११

स्त्रियांमाजी आहे कमतरपणा काय इतुका?
स्वसत्कार्यीं आह्मां अणु तरि श्रमाया बळ न का?
जरी दैवें शक्ती असति दिलि आह्मांसि अणुही,
स्त्रियांच्या स्वातंत्र्याप्रति उलथितों पृथ्वि अजि ही." ११२

ऐकोनि ऐसे रिति भाषणाला,
केलें न तेणें तिज उत्तराला;
संदेह दाटे मनिं राजपुत्रा
जिंकी अशा कोणचि प्रेमपात्रा. ११३

मनोवृत्ती त्याची घडिंत तिजला सर्व कळली;
सती न्याहाळोनी, मग निजमुखें काय वदली;
अहो ऐका आतां, कशि समयिं त्या योग्य वचना
महा युक्ती लावी निज-जनित-सत्कार्य-अवना:-११४

## दिंडी

"तुला वाटे गे असों आह्मि दुष्ट,
व्यर्थ झालों त्या नरांवरी रुष्ट;
परी जाणशि तूं किती भोगुं कष्ट !
असे झालें स्वातंत्र्य सर्व नष्ट ! ११५
देह अर्पूं हा कार्यसिद्धिलागीं;
बुडी डोहाच्या मारुं अधोभागीं;
तप्त पाषाणावरी चालुं वाट,
जरी कार्याचा सिद्धि जाय थाट. ११६

## श्लोक.

परी कठिण फार हें दिसत कृत्य सारें असे;
क्षणांत परिपूर्ण तें घडुनि सर्व येई कसें?
झिजेल जरि जाति गे सकळ नित्य या नारिंची
स्वतंत्र जगिं होणिया, तरि तयांस लागे रुची."११७
असें बोलतां कंठ दाटे तियेचा,
मुखीं दावि हेतू असे जो मनींचा;
गळे नेत्रपातींहुनी अश्रुबिंदु,
मुखा शोभवी, शुक्र तो जेविं इंदु. ११८
जातां जातां गोष्टि ऐशा करोनी,
आलीं, जेथें पर्वताच्या वरोनी
पाषाणाच्या पृष्ठभागीं प्रचंड
नादें मोठ्या कोसळे नीर थंड. ११९



गड गड गड शब्दें नीर वाहे निरोगीं;
थर थर थर कंपे अद्रि तो जागजागीं;
घव घव घव नादें पल्लवीं वायु खेळे;
पट पट पट वारू पातले तेचि वेळे. १२०

नाना सुरंगी तट धोंडियांचे
देती सुशोभा, जिथ नीर नाचे;
पाहोनि स्थूलास्थि तिथे गजांच्या,
उत्क्रांति-शास्त्रा कथि ती सुवाचाः—१२१

"जैशा सांप्रत दांडग्या दिसति गे! आह्मांप्रती अस्थि या,
तैशाही दिसतील अस्थि अमुच्या काळांत होणारिया;
आडाणी स्वयिं दांडगें असत जें विश्वांत, कालान्वयें
उत्क्रांती-नियमें हि उन्नतदशा त्या प्राप्त होवोनि ये. १२२

जुने प्राणि गेले, नवे प्राणि आले;
नवे गे! जुन्यांहूनि ते श्रेष्ठ झाले;
तशाही पुढें जन्मुनी श्रेष्ठ नारी
अह्मां पाठिं येतील ज्ञानी विचारी." १२३

साकी.

ऐकुनि ऐसें राजबाळिचें भाषण नृपतनयानें
उत्तर केलें समयोचितसें, नमूनि बहु विनयानें,
चंचळबुद्धी तो, । अपुल्या ज्ञाना दाखवितो—१२४

श्लोक.

"असें बोलतां येतसे हीण देवा;
विधाता कसा पूर्णज्ञानी ह्मणावा,
कृती जो करी पायरी-पायरीनें,
स्वकार्यी करावें जसें मानवानें? १२५

विधात्यानें केलें अंवतुनि तसें पूर्णचि घडे;
विधात्या श्रेणीनें स्वकृति करण्या भाग न पडे;
ह्मणा ऐसें कीं हो! 'निजकृति जसा माणुस करी
क्रमें, काळें, धाता स्वकृति मनुजांवाणि सुधरी'?" १२६

वदे इंदिरा तैं—"बहू तूं हुशार!
न ठावा शरीरोन्नतीचा प्रकार;
पुरी तत्त्वशास्त्राज्ञ तूं भासशी गे!
कुठें जाहलें प्राप्त हें ज्ञान सांगें! १२७

दिंडी.

अगे शास्त्रें इथ शिकवितसों सारीं,
सुगम करुनी तीं; स्त्रियां बहु विचारीं
असों उत्तेजन देत प्रेमभावें;
ह्मणों शास्त्रां इथ सारियां पढावें." १२८

श्लोक.

तदा बोलला चंद्रकेतू तियेला—
"नसे शारिराचा गुरू पाहियेला?"
वदे इंदिरा तैं—"न शारीरवेत्ती
इथे येउं देऊं; प्रयोजी अघा ती! १२९
सजो तो प्रकार प्रतापी नरांतें;
न शोभे कदाही मवाळू स्त्रियांतें;
नरांनींच त्या पातकी-शस्त्र-घातें
ससे, श्वान, यांतें चिरावें स्वहातें. १३०
शिरा, वाहिन्या, स्नायु, संधी, त्वचा-यां
हृदा काळजा रक्तपिंडादिकां त्या,
चिरावें स्फुरोनी, भरावें द्रवांनीं,
पहावें कसे होति व्यापार त्यांनीं. १३१

अशा धीट नाहीं स्त्रिया आजि झालों;
पदा नीच ऐशा न अद्यापि आलों;
मना वीट येतो अशीं क्रूर कर्में
बघोनी, घडों येति जीं गे अधर्मैं. १३२
विकृति जर किं येथें प्राप्त कोणाहि झाली,
निजकरिं करुं सेवा, औषधी पाजुं वेली;
हरगुणि उपचारां योजुं आह्मी विचारें,
प्रकृति निजजनींची रक्षुं साऱ्या प्रकारें. १३३
त्वां आद्य-विश्वंभर-विश्वकर्ता
याची असे योजिलि थोर वार्त्ता;
जाणें, असे निर्मियलें विधीनें
संपूर्ण विश्वा निजशक्तिमानें. १३४
ह्या बैबलीं[1] लेख असे लिहीला—
'हो रे उजेडा !'–तयिं तो उदेला;
माना न माना अशि बैबलोक्ती,
देशोधडीं अन्य विचार होती. १३५
काळावरी ठेवियलें जगा ना
उत्क्रांतिच्या दीर्घ परंपरांना;
निर्माण प्राण्या निजहेतु केलें;
तैं प्राणियां जीवन प्राप्त झालें. १३६
एक्या अवच्छेदिं विधी-कृतीनें
जें होय, तें ना वदुं ये मुखानें;
विश्वीं अतर्क्या करणी असे ती !
जी माणसांना न कळोनि येती ! १३७

---

१ तो=उजेड=प्रकाश. *Let there be light.*

"युग्म"

अज्ञान–बुद्धी जन तर्क खोटे
कोणी कसे बोलति, जेविं वाटे;
वाटे परी तें मजला असें कीं
जें जें बघूं आपण विश्वलोकीं, १३८
तें तें सुधारोनि परंपरेनें—
दुःखी स्त्रियां सर्व यथाक्रमानें
उत्क्रांति लाभो पुरि कालमानें!
'देवी'! ह्मणें 'मत्कृतिला यशा ने'!
यासाठिं मी स्त्रीसुखकारणीं जी
योजीं उपायां हर-येक! आजी!
माझ्या प्रमाणें कृति लोकिं कोणीं
केली नसे! होउ स्त्रियां शिराणी! १४०
स्त्री–उन्नतीचा बसवोनि पाया,
आरंभिलें मुक्त स्त्रियां कराया;
आतां उरे स्त्रीकरिं, शेषकार्या
येवोत साह्याप्रति सर्व आर्या. १४१
विश्वंभरे देवि अगे! सुबुद्धी
देवोनि **शक्ति**! करिं कार्यसिद्धी!
उद्युक्त केलें मम कार्यिं माते!
पावो यशा कार्यचि उत्तमा तें! १४२
ऱ्हासोनि जावो, जशि इच्छितें मी,
स्त्रीजातिची सांप्रतची गुलामी;
अंतास जी सत्कृति **शक्ति** नेते
साफल्य देवो श्रमियां स्त्रियां ते!" १४३
असें बोलली जें मनीं नित्य इष्ट,
स्त्रियांचें सदा चिंतिते जी अभीष्ट;

पुढें चालली बोलतां ह्याचि गोष्टी,
ह्मणे विश्व तो पाहुनी तेथ दृष्टीं— १४४
"अशा सुप्रसंगीं, अशा सुस्थळीं या,
किती मौज मित्रांसवें हो रमाया!
किती स्वप्रियासंगतीनें मनाला
महानंद होईल कामीजनाला!" १४५
"इंद्राचे भुवनापरी दिसतसे शोभा इथे सुंदरा,
तत्त्वज्ञानि इथे रमोनि अवघे जाती"–वदे इंदिरा;
"वार्त्ता कामिजनांचि येथ करिशी तूं व्यर्थ गे कासया?
कामाचा अमुच्या नसेचि नगरीमाजी मुळीं वास या." १४६

दिंडी.

तिणें आज्ञा मग केलि दासिंलागीं;
तंबु मोठा ठोकला रम्य जागीं;
गार चारीवर मधुर फळाहार
करिति दासी तिथ सर्व तो तयार. १४७
नारि इतुक्यामधिं ठाइं ठाइं गेल्या;
अद्रिशिखरावरि कोणि उभ्या ठेल्या;
कमलजेच्या शशिवदन संगिं आला,
करीं धरि तो कमलाक्ष मधुकरीला. १४८

श्लोक.

मार्गीं जो उठला प्रचंड धुरळा, सर्वांग तैं माखिल्या
अस्ताव्यस्त अशा समस्त महिला अद्रीशिरीं पातल्या;
घामाचा मुखिं लोट वाहत अशा साऱ्या तदा कोमळा
शोभा देति, नगोटिं जेविं तनुला, तैशा तदा त्या स्थळा.

## पद.

("वैशाखमासिं वासंतिक"—या चालीवर.)

या शैलशिखरिं रमत फिरति सकळ कामिनी,
ठायिं ठायिं जमुनि नारी, हर्षती मनीं ॥ ध्रु० ॥
पाषाण गारि धातुमिश्र क्षार मृत्तिका ।
हेम रौप्य ताम्र रंग श्वेत वा फिका ।
दगड बघुनि ह्मणिति तैं त्यांस नायिका;
चालतां प्रकार असा, येइ यामिनी. १
या शैलशिखरिं० १५०

संवाद-नामक तिसरा सर्ग समाप्त.

# स्त्रीवेषोपहास–नामक सर्ग चवथा.



श्लोक.

अस्ता अतां जात असे गभस्ती;
नक्षत्र बिंबें गगनीं उदेती,
छाया पडोनी रजनीकराची,
पूर्णेंदु-रश्मी दिपवीति प्राची. १
ह्मणे इंदिरा:–"हो चला जाउं आतां
बहू श्रांत झालों नगामाथिं येतां;
करूं या फळाहार; डेऱ्यांत जावूं,
सुखाची घडी घालवूं, भक्ष्य सेवूं". २
नगापायथ्याशीं उभा तंबु होता;
दिवे लागले तैं रवी अस्तिं जातां;
तयांचेवरी दृष्टि ठेवोनि नारी
कड्याखालिं येती, श्रमे जीव भारी. ३
उतरति करिं कोणी मैत्रिणीला धरोनी;
प्रियअनुचरिलागीं कोणि घे सांवरोनी;
पकडुनि तरु–वल्ली पाउलें कोणि टाकी;
सरसर कुणि धांवे, पायिं विद्युल्लता कीं. ४
अशा सर्व येवोनि डेऱ्यांत नारी,
तिथे बैसल्या मांडुनी चार हारी;
पुढें शोभतें अन्न नानाप्रकारीं,
बहू थाट शोभे, श्रमा सर्व हारी. ५

ह्मणे इंदिरा तैं:—"कुणी गीत गा हो?
**मृदू गानिं आनंद** कर्णास लाहो!"
तदा एक घेवोन सारंगि पाणीं,
करी गायनारंभ मंजूळ वाणी:—६

पद. राग जोगी. ताल धुमाळी.

("जाते कीं मम शकुंतला ही"—या चालीवर.)

कां अश्रू हे नयनीं येती ! कांहिंच समजेना.
**शक्ति** वरें अशि स्फूर्त्ती दिधली कां तरि ही त्यांना!॥ध्रु०॥
हृदयीं निराशा जागृत कां ही, तुरवी देहभाना !
कां मन्मन हें चंचळ झालें, न भुले धनमाना !
कां वैराग्य—कंटक नाशी या **शरीरोद्याना** !
काय जुने दिन गेले ह्मणुनी चळविती नयनांना. ७
कां अश्रू० ७

पद. जिल्हा झिंझोटी. ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

परदेशा मित्र जाई जैसा तो प्रेमळ,
जिवलगां लावि साऱ्या, अंतरिं तैं हळहळ;
तैसा तो पूर्वकाळ अजि अंता पावला;
उदयातें नविन आला, कहर जनीं जाहला. ८

**अंजनीगीत.**

मानव मरणोन्मुख तो होतां,
कर्णीं ये ना ध्वनि आयकितां,
हालतां ये ना नेत्रपातां,
गात्रें गळताती; ९

तैसा झाला हा गतकाळ,
ह्मणुनी जग हें झालें विव्हळ;
पुनर्जीवनीं श्रम निष्फळ
जातिल ते सारे. १०

पद (पंजाबी ठुंबरी) जिल्हा झिंझोटी ताल त्रिवट.

("गाहो जगपति"—या चालीवर.)

मृतसखयेचें स्पष्ट जसें तें,
चुंबन स्मरणीं अक्षय राहतें;
अथवा प्रेमळ निजपत्नीचा,
प्रेमा हृदयीं जागत साचा;
तैसा हा गतकाळ हृदांतरीं
जागत राही पडतां हारीं". ११

दिंडी.

गीत गातां तन्नयनिं अश्रु आले,
लाल गालांवरि अश्रु-लोट चाले;
वाणि प्रेमळ मंजूळ तिनें ऐशी,
काढली कीं ती गेलि हृत्तळाशीं. १२

श्लोक.

गीतें ना रुचलीं विरोध भरलीं ऐशीं परी इंदिरे;
ऐकोनी निजकर्मवर्म कथिलें, क्रोधें मनीं ती स्फुरे;
धिक्कारोनि वदे:—"जरी गतदिनां गावोनियां गे अशा
वाणीतें इथ काढिशी सुसमयीं, का त्वन्मनाची दशा! १३
गेले जे दिन जाउं दे, मनन तें त्यांचें कशा पाहिजे?
येणारे दिन ते बरे उजडती—चिंता अशी वाहिजे;
गेला काळ नरांचिया धमकिचा, आतां करूं राज्य या;
त्यांशीं तुंबळ योजिला समर हा, पावूं सुकाळीं जया. १४

पद राग बिहाग. ताल त्रिवट.

**"रामा नवल बघ हें"**—या चालीवर.

(अण्णा मार्तंडकृत उत्तररामचरितांतील).

पुरुषांला विषप्राय झालें मी, । आयका स्त्रियांनो. ॥ ध्रु ॥
उपाय योजा जेणें आपुला । मानस सिद्धिस पूर्ण जाय,
ध्यांस लागला स्त्री–उन्नतिचा । लढुं या बघतां काय? ॥१॥
पुरुषांला० ॥
हा महिलांचा समाज पहिला । सकल महीला सौख्याधार
होऊं द्या; ही नरबळजोरी । स्त्री-मुखिं वदवी हाय."॥२॥
पुरुषांला०

**श्लोक.**

वदे इंदिरा राजपुत्रा तदा तीः—
"ह्मणा गीत कांहीं, तुह्मां गांविं गाती;
प्रशंसा नको हो भल्या ती नरांची,
नको त्यांत गाऱ्हाणिं गेल्या दिसांचीं.१६.
परी गा कसे दीस येती स्त्रियांना,
स्थिती योग्य होई कशी प्राप्त त्यांना."
तदा गीत तेणें स्वयें कल्पिलेलें,
मुखें मंजु घोषें तिथें गाइयेलेंः–१७.

**पद.** जिल्हा झिंजोटी— ताल त्रिवट.

**चंद्रकेतु रविवंशीं**—या चालीवर.

दक्षिणेशिं उडुनि जाई झडकरि अगे कोकिले !
प्रियसखिच्या बसुनि दारीं, वद तुज जें कथियलें !
'निर्दय कीं दक्षिणेचे जन, तैसे चंचळ;
नसति तसे उत्तरेचे; हृदयीं ते कोमळ. १८

पद. ( त्याच चालीवर. )

तुजसवें उडुनि येतों, जरि असते पंख ते;
वसुनियां दारिं तीच्या, दाखवितों प्रेम तें;
तिशिं करुनी गोड गोष्टी, तिज प्रेमें जिंकितों;
घालुनियां मोह तितें, तिचि करुणा भाकितों ! १९

पद. ( त्याच चालीवर. )

तुजसम मी कोकिले गे! पक्षि न कां जाह्लों !
कुणि काळीं स्कंधिं तीच्या तरि असतों बैसलों ।
स्थळ मिळतां एकदा तें कधिं नचि तें सोडितों !
आनंदें जन्म सारा तेथें मी पहुडतों! २०

पद. रागिणी भैरवी—ताल त्रिवट.

हृदयीं तिच्या कां प्रेम न जागे?
तरुणी अशि कां निष्ठुर वागे? ॥ ध्रु० ॥
कोकिले! तिजला सांगें, फिरें मी
शुद्ध्यर्थ तिचिया दक्षिणग्रामीं; ॥ १ ॥
उत्तरग्रामा सोडून आलों,
कीर्तीस तिचिया लुब्ध मी झालों. ॥२॥ २१.

पद. ( याच चालीवर. )

क्षणिक असे हें मानव—आयु,
परि प्रेमभाव राहे चिरायु० ॥ ध्रु० ॥
उत्तरदेशीं कामिनी-यौवन
बहुदिन राहूनि हर्षवी स्त्रीजन; १
दक्षिणदेशीं अल्पवयीं तें
सौंदर्य यौवना सोडूनि जातें. २ २२

## श्लोक.

त्यजुनि कोकिले! रम्य या वना
गमन गे करीं दक्षिणी जना,
उठविं तूं तिच्या प्रेम मानसीं;
वद तिच्याचि मी जाइं भेटिसीं. "२३
परिसुनि अशिया त्या राजपुत्राऽऽननींचें
नररव भरलेलें गायन, प्रेम साचें,
सकल युवति पाहों लागती एकमेकां,
गद गद गदनादें हांसती सर्व त्या कां. २४
जरी गायनाचें कळेनाचि मर्म,
तरी हांसतां एक, दूजी स्वधर्म
असे हांसण्याचा असें मानुनीयां,
हंसें येइना तोंहि लागे हंसाया !२५
वदे इंदिराः-"मंडुकाचे परी हा
ध्वनी ऐकुनीयां सुटे कंप देहा;
असे काय हा कंठ, ऐसा स्त्रियांचा !
नसे अर्थ शब्दांत, ना गोड वाचा. २६
असे गाइला सर्व श्रृंगार बाई,
नसे अर्थ, वा त्यांत कांहीं नवाई;
जुनी गोष्ट सारी, स्त्रियांना वरावें-
रुचे तोंवरी त्यांप्रती लुब्ध व्हावें ! २७
पुढें एक सोडोनि दूजी धरावी,
कृती निंद्य ऐशी किती ही करावी;
नसे कांहिं लज्जा, न कांहींच भीती,
न मानीति शास्ता; अशा घोर रीती. २८

वर्चस्वा मिळवावया पुरुष हे स्त्रीदास्यही भोगिती !
आली हातिं तयां लगाम. मग ते कांहींच ना मानिती;
स्त्री आहे अति नीच, आपण धणी, भावे तसें वागती;
ऐशी दुःखद सत्य ही जगिं सदा आहे स्त्रियांची गती. २९

करीं खाटिकाच्या पडोनी मरावें,
परी या नरांच्या न हातींच यावें;
विधीनें असा काय संकेत केला,
नरांच्या करीं सर्व व्यापार गेला ! ३०
असे गाइला व्यर्थ शृंगार सारा,
न ये या स्थळीं आमुच्या तो विचारा;
वृथा मानुं तो सर्व प्रेमा नरांचा,
प्रसंगानुसारी वृथा त्यांचि वाचा. ३१
तुह्मां गांवच्या नारिंची रीतभात
अहो वर्णिलेली असे पूर्ण ज्यांत,
असें कांहिं आह्मांस गावोनि दावा.
बहू इच्छितों काळ मौजेंत जावा. " ३२
अशा आर्जवें इंदिरा ती सुनेत्रा,
तदा प्रेक्षुनी बोलली राजपुत्रा;
तसें गीत गावें तदा मानसाचा
असे हेतु त्याचा, स्फुरे तेविं वाचा. ३३

साक्या.

इतुक्यामाजी शशिवदनाच्या माद शिरीं मद्याचा
शिरला, नुरलें देहभान त्या तान सुटे गाण्याचा.
गाण्या लागे तो, । तेणें आगी पेटवितो. ३४

स्त्रीकर्णाला निषिद्ध ऐशी ठुंबरी मुखिं त्या येतां,
चकित जाहल्या सर्व कामिनी, उपजे मनिं त्यां चिंता.
ऐसा घोर पडे, । क्षणिं त्या गर्दी एक उडे. ३५

दिंडी.

दटावी तैं कमलाक्ष त्या खुळ्याला;
मुखीं येई म्लानत्व कमलजेला,
मधुकरीनेंही अधोवदन केलें,
ह्मणे "झांकीलें तेंचि उदयिं आलें!" ३६
"खबर्दार !" ह्मणे इंदिरा सकोप;
चंद्रकेतूच्या हृदयिं होइ लोप
मित्रभावाचा, तदनु तैं शशीतें
उरीं हाणियली मुष्टि रुष्ट घातें. ३७

श्लोक.

"खबर्दार मूर्खा !" ह्मणे राजपुत्र;
उरीं लागतां मुष्टि, तत्प्राणमित्र
भयाभीत होऊन राहे उभा तो;
पडे हांक मोठी, नभीं नाद जातो. ३८
मधुकरि तयिं कंपें दीर्घ आरोळि फोडी;
दचकुनि उठली ती इंदिरा तैं तडाडी;
वदलि;—"त्वरित आणा घोडि ! जाऊं घराला
कहर हर ! इथे हा घोर कां आजि आला !"३९
सकल युवतिंमाजी एक कल्लोळ झाला;
पळत सुटति साऱ्या; कोणि नाहीं कुणाला
पुसतचि, परि धांवे, सांपडे जेथ वाट;
विरस परम झाला; मोडला सर्व थाट ! ४०

ऐशी ही मदिरा सुरासुरनरां जी मानली ना कदा,
झाली त्या अबलाकलापिं दमल्या अत्यंत दुःखास्पदा;
यासाठीं विषतुल्य हो, जन कदा ही प्राणहंत्री सुरा
सर्वांशीं कुलनाशका भयकरी सेवूं नका दुर्धरा.
आहे औषधि दिव्य सत्य जरि ही वैद्यांचिया हस्तकीं;
त्यालागीं सुखदा नितांत गुणि, जो लोळे जराग्रस्त कीं;
ऐषारामिं तरी अवश्य नसतां, केल्या हिचें सेवन,
मारावी बुडि जाणुनी जळतळीं, तैसें करी जीवन. ४२
धोका तैं हृदयांतरीं बसतसे, वैद्यां नये काढितां;
गात्रें होति हळूहळू शिथिल तीं, उन्माद तो वाढतां;
लागोनी थरकांप हस्तपदिं, ते होवोनि जाती कृश,
संभारा तनुच्या न साहुं शकती, वैरी असें हें विष.४३

### दिंडी.

राजपुत्राची अशी तैं निराशा
झालि; गेले श्रम व्यर्थ सर्व नाशा !
उभा राहे कमलाक्ष तया संगीं,
दुजें नुरलें कुणि तेथ त्या प्रसंगीं. ४४
पळे युवती एकेक कंपितांगी,
तसा तिळतिळ तो तुटे अंतरंगीं;
पळत अश्वांच्या पाउलास ऐके,
तया प्रत्येकीं बसति हृदीं ठोके. ४५

### श्लोक.

लेखें हातवळा, मळा शिंपडितां, गातां सुधारे गळा,
तैशीं दोन हृदें समीप असतां काळेंहि लागे ळळा;
ऐशी आस धरोनि राहत सदा जो इंदिरेच्या सवें,
त्यालागीं विपदा अशी भयकरी, कल्पांतिं ना सोसवे. ४६

**दिंडी.**

कशी आतां भेटेल इंदिरा ती ?
दिसे पुनरपि कीं नाहिं ? अशी भ्रांती
पडलि त्यातें; न कळेचि कुठे जावें,
काय तीच्या प्राप्त्यर्थ तें करावें. ४७
क्रुद्ध झाला मनिं; ह्मणे आपणाशीं:–
"थोर, शशिवदना, अससि मौर्ख्यराशी!
कशा जाळाया पिउन मद्य रे तें,
असें नाशावें तुवां स्वकार्यातें? ४८
अरे ऐसा का अंत आजि व्हावा?
घडा गुह्याचा असा कां फुटावा?
भेट पुनरपि हो ! होइ कधीं जेव्हां
इंदिरेची; ती हरपलिसे एव्हां !" ४९

**श्लोक.**

मनीं आपणाशीं करी जैं विचार,
तया कर्णिं येती तदा शब्द घोर:–
"धरा हो धरा, स्वामिणी हो ! बुडाली !
प्रिया मावली नीरडोहांत गेली" ! ५०

**साकी.**

धांवत असतां घोडि तियेची नदिधरणा उतरोनी;
निसटुनि पडली तिच्यासकट ती, जाती दोन्हि बुडोनी;
पडली हाकाटी, । झाली तीरीं बहु दाटी.

**श्लोक.**

परिसुनि ध्वनि ऐसा धांवला राजपुत्र,
पसरट जिथ होतें थंड तें नीरपात्र;
शिरुनि युवति-मेळीं शीघ्र तो तीरिं ठेला;
बघितलि पडलेली नीरिं त्या इंदिरेला. ५२

पाहोनी पडल्या जळीं तरतशा त्या इंदिरेला, सवें
मारीली उदकीं बुडी नृपसुतें काढावया गौरवें;
जी अर्ध्या जगतास रक्षक असे स्त्रीजातिची स्वामिनी,
डोहा द्यावि कशी, करोनि उघड्या त्या सारिया कामिनी ? ५३

नदीमध्यभागीं प्रयत्नें तरोनी,
तिचा हात युक्तिप्रयासें धरोनी
तिला वामहस्तें जळाच्या तरंगीं
ह्मणी पोंहवी, भ्यालि जी अंतरंगीं. ५४

जळाचे तरंगांमधीं झाड होतें;
धरोनी तयालागिं तो सव्य हातें,
नदीच्या तटीं पावला शूर वीर;
अशा या ह्मणावें नरा धन्य धीर ! ५५

"गतप्राण झाली महा-सुंदरी ती"
ह्मणे आपणा चंद्रकेतू—" न भीती
हृदा बाळगीं; रे महत्कार्य झालें,
करें या तडी इंदिरेलागिं नेलें. ५६

दिंडी.

कधीं न कधीं येईल उदयकाल,
तदा कामीं मम कृत्य हें पडेल;
हृदा ! होऊं रे ! नको उतावीळ !
अंतिं भेटे ती, थांब कांहिं वेळ !" ५७

श्लोक.

खांदे सांवरिली श्रमोनि बहु तैं त्या राजकन्येप्रती;
घेवोनी चढला तटावरुनियां, तों एक तेथें सती
दे त्यातें निजहस्तका गलित तत्कार्ये धराया करीं;
तंबूची धरिं वाट तो नृपसुते वाहोनि खांद्यावरी. ५८

आर्या.

ठेवुनि तंबूमाजी नृपजे, तन्मुख सभीति न्याहाळी,
'मरते कीं जगते ही!'–भ्रांती पडली तयास त्या काळीं.५९

श्लोक.

ह्मणाल्या रवें एक त्या सर्व नारीः–
"असे जीव हो इंदिरेच्या शरीरीं!"
तदा राजपुत्रें पहा काय केलें,
पुन्हा तोंड ना त्या स्थळीं दावियेलें. ६०

ह्मणे, "कोविं दावूं असें तोंड काळें ?
न जाणें, किती कोप ये राजबाळे;
असे काळिमा या त्रिवर्गास आली;
प्रिया-प्राप्तिची वाट ती बंद झाली !" ६१

न देखीयले मित्र त्यानें कुठेंही;
निघे शोधण्या त्यां बहू श्रांत देहीं;
अरण्यांतुनी एकटा त्या अवेळे
पदीं वाट चालोनि ये पाठशाळे. ६२

चंद्राचा पडला प्रकाश गगनीं तैं पूर्णिमेचा पुरा;
वाटे रात्र नव्हे, परी उगवला कीं दीस तो साजरा;
कीं आला उदयाप्रती रवि जणूं त्यागोनि उष्णप्रभा;
ऐसा त्या रजनीस रंग भरला, आली सुशोभा नभा.६३

मार्गीं जातां थोर आले विचार;
ग्लानी आली अंतरंगास फार;
अंतीं आला पाठशाळेसमोर,
उल्लंघोनी कांचनी मुख्य द्वार. ६४

### साक्या.

सरस्वतीचा ज्या द्वारावरि पुतळा साजत होता,
कांचन नगरीं पुन्हा पहातो शिरतो नृपसुत आतां,
उद्यानीं गेला, । निराश! गडबडला! ६५
निमग्न असतां विचारिं अपुल्या फिरतांना उद्यानीं,
तयें देखिलें कमलाक्षा तिथ, धरिलें त्या बाहूंनीं.
बोलेः—"कमलाक्षा, । झाली आशेची रक्षा." ६६

### दिंडी.

तदा "मित्रा!" कमलाक्ष तो ह्मणालाः—
"हळू बोल, किं ना ऐकुं ये कुणाला;
शोधितातीं ह्या नारि आपणाला;
धरूं, दंडूं या बोलती तिघांला. ६७
मंदिरांतरिं इथ शोध चाललाहे,
इंदिरा ती एकेक नार पाहे,
पुसे प्रत्येकिस कोण काय जाणे;
ह्मणे जी ती कीं त्रिवर्गासि नेणें. ६८

### श्लोक.

मधुकरि परि येतां राजकन्येपुढें ती,
उठवित करुणेतें मानसीं पूर्ण रीती;
अभिमुख उभि राहे मान घालोनि खालीं;
प्रथम मुळिं न तेथें शब्दि कांहीं ह्मणाली. ६९
पुसे इंदिरा जैं तिला आग्रहानें,
कथी ती, जसें जाणिलें सर्व तीनें;
ह्मणे स्पष्ट ना, माय कीं वृत्त जाणे;
असो कोण, कां येथ केलेंचि येणें. ७०

कमलजेविशीं जेविं इंदिरा
पुसत बाळिला, तैं न उत्तरा
मधुकरी करी; ना वदे, असे
सकळ ठाउकें वृत्त वा नसे. ७१

मौन पाहुनी बाळिचें असें,
लाजल्यामुळें म्लान जी दिसे,
योग्यसा तदा अर्थ काढिला;
वृत्ति बाळिची ठाउकी तिला. ७२

धाडी दासिंस शीघ्र तैं कमलजे पाचारण्या इंदिरा,
येती त्या परतोनि; दासि ह्मणती 'धुंडीयलें मंदिरा,
कोठें ना परि ती मिळे कमलजा; सोडूनि गेली असे;
बागा शोधियल्या; न थांग परि तो लागे, न कोठें दिसे.' ७३

ह्मणे इंदिरा ऐकुनी ह्माचि वाचेः–
'धरा पोर, बाहेर टाका तियेचें;
नको, झालि द्रोही जिची माय साची,
नको खूण येथें मुळीं त्या स्त्रियेची.' ७४

शशिकलेसि बलावियलें असे
सकळ हें पुसण्या 'घडलें कसें;'
असुनि ठाउक, जें इथ जाहलें,
न कथिलें, परि गुप्तचि ठेविलें. ७५

## साकी.

अशी चौकशी दर्बारीं ती मोठी आतां चाले;
निसटुनि तेथुनि तुला भेटलों, योग्यचि मित्रा! झालें;
सांगें, जाशि कुठे ?। पडले विचार अजि मोठे !७६

## दिंडी.

कुठे आहे शशिवदन, कमलजा ती?
काय गेलें द्वय पळोनि सांगातीं?
हीच त्याची रे भीति मला होती;
उगा धरिलें हें महत्कार्य हातीं!" ७७

## श्लोक.

ह्मणे चंद्रकेतू "उगा दोष देशी;
नसे मित्र तो एवढा दुष्टराशी;
अरे प्राशुनी मद्य तो मस्त झाला,
तरी तद्गुणा काय बा अंत आला? ७८
न का मद्य सेवूनि कोणी कदाही
सुखानंद घेवोनि मौजेंत राही?
पडे भूल त्यालागिं या स्त्रीजनांची,
सुरेनें स्थिती पालटोनी मनाची. ७९
भ्रमें गाइलें पूर्ण शृंगार-भावा,
तरी पापि केलें तयें का स्वजीवा?
ह्मणावें न जें स्त्रीपुढें तें ह्मणाला,
ह्मणोनी सदा काय तो निंद्य झाला? ८०
बीभत्स याहूनिहि का नसे तें,
अश्लाघ्य वाटे बहु जें मनातें?
गौणत्व का ना वचनीं कधीं गा,
रोमांच आणी क्षणिं सर्व अंगा? ८१
स्वयें हाडिं रे मूळचा चांगला तो;
पळोनी कसा एकटा सांग जातो?
स्वभावें खुला तो, न कापट्यरूपी,
कसा आपणां त्यागि तो या विलापीं? ८२

जसा गोड अंगीं सदा इक्षुदंड,
जरी कारल्या आळिं वाढे उदंड,
तसा रे शशी तो, जरी मद्य प्याला,
तरी हाडिंचा नाहिं सद्वर्ण गेला." ८३

साकी.

ऐसें मित्रा बोलत आहे, आल्या इतुक्यामाजी,
दोन बायका, ह्मणति त्यांजला—"नांवें हो सांगा जी;"
धरिती कमलाक्षा, । वाटे द्याया कीं शिक्षा. ८४
धांव घेतली राजकुमारें, वाटे निसटुनि गेला,
पळतां पायीं कंटक रुतला, काढाया तो ठेला;
जर्जर तैं झाला, । बायां-हातीं सांपडला. ८५

श्लोक.

नेलें राजकुमारि सन्मुख तयां दोघां क्षणाभीतरीं,
जेथें बैसलि होति राजतनया विस्तीर्णशा मंदिरीं;
भाळीं एक हिरा विशाळ तिचिया भांगावरी गोंविला,
खांदे लांब सुकेश कृष्ण पडले, त्यां-अग्रिं तो शोभला. ८६

दिंडी,

तिच्या पायांशीं पडे मंजुळा ती,
वामभागीं मधुकरी उभी होती,
तिच्या सन्मुख ती शशिकला उभेली,
काय ऐका तयिं इंदिरे ह्मणाली:—८७

श्लोक.

"जुना काळ गेला तदा इंदिरे! तीं
दुजे रीति कार्यें इथे होत होतीं;
तुला शब्द माझा सदा मान्य होता,
विचारीत होतीस तूं येत जातां. ८८

मता घेत होतीस, जें वंद्य नित्य;
सदा बोललयें, वाटलें तेंचि सत्य;
नसे हालली माझियेवीण काडी;
वदें, जें पडे भाग तें तूज-पाडीं. ८९

तुला वाढवीलें, तुला खेळवीलें,
सुधातुल्य गे! ज्ञान म्यां पाजियेलें,
तुला पोटिंच्या अर्भका ह्या समान
सदा रक्षियेलें उराशीं धरोन. ९०

जरी जन्मदात्री दुजी गे असे ती,
खरी माय मी; वाढवीलें स्वहातीं;
तुला गोष्टि सांगोनि मी उन्नतीच्या,
दिलें शिक्षणा पूर्ण उच्चा प्रतीच्या. ९१

परी वेळ ती पालटोनी ग गेली,
प्रतिस्पर्धि जेव्हां स्थळीं येथ आली;
तिनें काळिजा तूझिया चोरियेलें
तुझें चित्त गे आपणाठायिं नेलें. ९२

हळुहळु मग तूं गे दूर केलेंस मातें;
मन मम फुटताहे ऐशिया दुष्ट घातें;
उमजत मज नाहीं काय अन्याय झाला?
उभविलि कृति ऐशा यावया का फळाला? ९३

सुरळित तव जावा हेतु अंतास गे हा,
ह्मणुनि त्यजुनि साऱ्यां इष्टमित्रांस गेहा,
तव पथ धरिला म्यां, सर्व सोडोनि आलें;
सकळ मुकुनि आतां, योजिलें कार्य गेलें! ९४

साक्या.

आजवरी हें सोसुनि राहें, धरुनी पुढची आशा,
कधिं तरि वळशिल मजवरती तूं, करिशिल ना मम नाशा,
आहे निष्ठा ही ! । चित्तीं इष्ट तुझें वाहीं. ९५.
तुजविण नाहीं या सत्कार्या त्राती अन्य कुठें ती !
जावो सिद्धी, धरिलें जें हें महत्कार्य गे हातीं !
आहे निष्ठा ही, । चित्तीं इष्ट तुझें वाहीं ! ९६

दिंडी.

परी प्रेम तुझें कमलजेवरी तें
अधिक झालें, हें स्पष्ट कळुनि येतें;
नवी येई स्त्री इथे शिकायाला,
कमलजेशीं तूं धाडिशी तियेला. ९७
असे परदेशी अल्पविद्य स्त्री ती,
अल्पसंतोषी कमलजा विजाती;
तुझ्या गांवचि मी बहूतां दिसांची
सोबतिण, तव शुभ इच्छिणारि साची. ९८
तुझ्या हातीं मम कार्य-श्रेय आहे,
दंड भोगीं मी ह्मणोनीच का हे ?
अंतिं ओळखिशिल, काय रूप आहे
कमलजेचें तें; हीच वाट पाहें. ९९

श्लोक.

आले गे इतुक्यामधींच वृक हे, कां येति, ना सांगवे,
तोंडा लावुनि तोंड ती गतदिनीं बैसे तयांच्या सवें;
जाणें, पूर्ण तिघांसि ती वळखिते, तीच्याच ते गांवचे;
रात्रीं ओळखिलें तयां, तदुपरी कांहीं न मातें सुचे. १००

सांगावें तुजलाचि वृत्त अवघें, जावें दुजें गे कुठे !
होतें येत तुझ्याकडे, मनिं परी संदेह मोठा उठे;
वाटे तूं ह्मणशील 'गे कमलजे वृत्तांत सारा पुसूं;'
ऐसें जाह्लिया, मनीं समजलें, दोघीहि अंतीं फसूं. १०१
त्वां जावोनि तिला जरी पुसियलें, नन्ना तरी ती धरी;
नानारीति तुला बहू शिकवुनी तूझ्या शिरे अंतरीं;
त्वां तीतें पुसिलें जरी, धरिल ती नन्ना तरी सत्वरीं,
अर्जीनें उठवील ती पुरि दया भोळ्या तुझ्या अंतरीं.
बोलोनी तुशिं गोड गोड वचनें केल्या कृतीची क्षमा
ती मागेल, तदा ह्मणेल ह्मणि कीं 'ही पावलीसे भ्रमा.'१०२
सांगेल कीं 'ही बहु द्वेषकारी
आहे, ह्मणोनी कृति या प्रकारीं
हिची असे ऐशि दगा कराया,
उच्चा पदातें मम या हराया!' १०३
राहें भिऊनी जरि या अपेष्टे,
आल्यें असें मी इथ फार कष्टें;
तीन्हींवरी ठेवुनि योग्य दृष्टी,
म्यां घालवीली बहु रात्र कष्टी! १०४
येवोनि पाहें तंव गे! दुपारीं
गेली पहाडास तुझी सवारी;
होती तिथे गेलि तुझ्यासवें ती,
'सांगेल सारें' ह्मटलें स्वचित्तीं. १०५
असे काय ठावें तुला सर्व वृत्त?
कशी येथ आली महा-दुष्ट जात?
इथे कासया पातलें हें त्रिकूट?
स्वलग्नें इथे पाडण्यालागिं तूट? १०६

पळाली असे येथुनी साह्यकर्त्री,
असे मूळ नाशासि सत्कार्य-हंत्री;
कसें तोंड दावील ती येथ आज ?
नुरे काय तीतें मुळीं कांहिं लाज ! १०७

आर्या.

शशिवदना सांगातें गेलीसे जाण कमलजा खास !
वरिलें असेल आजी, अथवा वरणार ती पुढें त्यास. १०८

श्लोक.

अग ! इथ उरलीसें एकली या स्थळीं मी,
तन मन धन ज्यांची वेंचलेंसे सुकामीं;
बिघडलि कृति ऐशी, क्रोध तैं पावशील;
मजवरि सकळांचे दोष तूं घालशील. १०९

परी जाणशी तूं झटें येथ केवीं,
तुझ्या कार्यिं मी केविं मच्चित्त लावीं;
असे दोष माझा तरी लाविं वाटे,
पहा गे ! पुढें काय होतील तोटे ! ११०

चहूंकडे होइल ती फजीती,
पडूं नरांच्या मुखिं सर्व रीती;
पुरें जगीं होइल हांसणें तें:-
'करूं शकूं ना धरूं जें किं हातें'." १११

तदनु इंदिरा तीस बोलली:-
"शपथ वाहिली आजि मोडिली;
गमन तूं करीं पाहिजे तिथे;
मुकशि कन्यका, ठेवुं ती इथे." ११२

शशिकला ह्मणेः—"सर्व ही कृती,
सकल थाट हा उन्नतीप्रती
प्रथम गे असे योजिला स्वयें;
वदसि हें तरी कोणच्या नयें?" ११३

धरुनि मधुकरीचा हस्त बोले तिला तीः—
"चल, उठ, निजमार्गी जाउं आल्याहि रीती;"
वदुनि वचन ऐसें जाह्ली ओणवी ती;
मधुकरि कंवटाळी विव्हळा माय [1]वीती. ११४

"युग्म"
उठुनि मधुकरी तैं आइच्या स्कंधभागीं
निजशिर गलितांगी ठेवि, बाळा अभागी;
निज-जननि-कृताऽऽज्ञा मोडिना जी कदा, ती
मधुकरि मग हस्ता घालुनी माय-हातीं, ११५
वळुनि वळुनि पाहे इंदिरेच्या मुखाला;
नयन भरुनि अश्रू-बिंदुंचा लोट आला;
निजहृदिं कमलाक्षा प्रेम आलें अपार,
स्वमनिं ह्मणतसे "हा! लेंकरा काय घोर!" ११६

साकी.

इतुक्यामाजी मंदिरद्वारीं गडबड ऐकूं आली;
धांवत तेथुनि एक नार ये, कंपित, बहु दमलेली;
दिसली घाबरली, । हातीं पत्रें आणिवलीं. ११७

श्लोक.

पत्रिका दिल्या राजबाळिला;
वाचुनी तिणें अर्थ जाणिला;

---

१ वीती=विणारी=जन्म देणारी, प्रसवणारी.

नेत्रवर्ण तैं लाल जाहला,
कोप तन्मनीं शीघ्र दाटला. ११८

तदा थोर आवेश आला तियेला,
तनू कंपली, गाल आरक्त झाला;
बहू दुःख होवोनि कोपाग्नि पेटे,
मुखीं शब्द ये ना, तिचा कंठ दाटे. ११९

फिरवुनी मुखा चंद्रकेतुला
निरखिलें; उभा जेथ राहिला,
चुरुनि पत्रिका तेथ फेंकिल्या;
उचलुनी तयें हातिं घेतल्या. १२०

मुळिं जरि वदली ना शब्दही ती मुखानें,
तरि समजुनि हेतू इंदिरेचा तयानें,
उघडुनि चुरलेल्या पत्रिका वाचियेल्या;
पितर उभयतांचे यांहिं त्या पाठवील्या. १२१

**साकी.**

पहिलि पत्रिका गजेंद्ररायें कन्ये लिहिली होती,
चंद्रकेतुच्या घाबरलेल्या पडतां जनका हातीं.
कन्ये लिहिलें कीं । "न घडो दुर्लौकिक लोकीं." १२२

पद. जिल्हा झिंजोटी—ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

"नृपसुता धाडिलें जैं तुजपाशीं कन्यके !
नगरींचे नियम तूझ्या मज नव्हते ठाउके;
बहु भ्यालों अंतरीं कीं प्राणा तो तैं मुके;
आणि आलों सांगण्या कीं तैं मरणा तो चुके. १२३

## साक्या.

इतुक्यामाजी सांपडलों मी सत्यध्वज–नृप–हस्तीं;
चंद्रकेतुला मारशील तूं हे पडली त्या भीती;
आणुनि सेना तो, । वेढा तव नगरा देतो." १२४
पत्र दुजें तें लिहिलें होतें सत्यध्वज नृपतीनें;
योग्य शब्द तयिं, विचार करुनी योजियलेचि तयानें:—
"वेढा नगरींचा । गणिं सुतरक्षणार्थ साचा. १२५

## श्लोक.

माझा पुत्र असे तुझ्या नगरिं तो, केशाग्रिं त्या होउ ना
कल्पांतीं कशिही कुणेपरि इजा, ऐशी करीं योजना;
येवों दे परतोनि त्या पुनरपि ग्रामीं सुखें आपुल्या;
दे त्यातें कर आपुला, घडविं तैं कार्याप्रती योजिल्या. १२६

पद. ("तुह्मां तो शंकर सुखकर हो"–या प्रबंधाचे चालीवर.

कुमारी! कुमाराप्रति कर दे; ॥
निशिदिनीं हृदयिं मनिं आननिं,
नृपसुते, गुणमये, सुंदरे,
प्रिय बहू वससि मम सुताच्या सदा गे. ॥ ध्रु० ॥ कुमारा०
रूप तव अति सुचिर तोषद मानुनी, ग्रामा धामा
त्यजुनी, पातला अंगना–शुद्धि–प्रति सुहृदांसवें
शौर्ये, कामिनी-वसन-भार लेवुनी, संकटा न जुमा-
नुनी, योजनें उल्लंघुनी, वीर, सुंदर योग्य
तरुणी आला वराया प्रमोदें. ॥ कुमारी! ॥ १ ॥ १२७

पद. राग कामबोध ( ताल सुरफक्ता ).

"मनीं इष्ट बहुकाल संकल्प केला"—या चालीवर.

पुन्हा एकवार मागतों तूजपाशीं,
ऐक रूपशाली मम वचनाशीं. ध्रु०
दिव्य हे सुंदरि! राजपुत्रा वरीं,
आपुलासा करीं; योग्य तूतें. १ पुन्हा०
सोड ह्या खटपटी, यश न ये शेवटीं,
व्यर्थ भलत्या अटी गे! न घालीं.
पुन्हा एकवार०. १२८

श्लोक.

स्त्रियांपेक्षां वाटे नरगण जरी नीच तुज तो,
तुझी मिथ्या आहे सकळ कृति आह्मी समजतों;
करूं संग्रामातें, जरि न सुखि ये मत्तनय तो;
पित्याला जिंकोनी सकळ तव गर्वास हरितों. १२९

पद. जिल्हा झिंजोटी—ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

सोडुनि दे कृत्य हें तूं, अघटित ना करिं उगा!
स्वीकारीं त्यास तूं, जो तुज मानी जिवलगा;
जोडीं गे राष्ट्र-युग्मा, शोभशि ज्या स्वामिनी;
अचळ स्त्रीराज्य नोहे, दुर्बळ गे कामिनी. १३०.

आर्या.

त्या मारिशील जरि तूं, जाण पुरें निश्चयें तुला सांगें—
कांचननगरीचा मी फडशा पाडीन सैन्य
आणुनि गे!" १३१

श्लोक

पत्र वाचतां येथ थांबला,
राजपुत्रिला स्पष्ट बोलला:-
"पातलों न त्वत्कार्य-नाशक;
द्वारिं येइं **त्वत्पाणि-याचक.** १३२

पद (होरी); रागिणी भैरवी, ताल-दीपचंदी.

काय असा मीं अपराध केला,
लोटूनि दिधलें त्वां गे मजला? ध्रु०
मज एकट्याला सोडुनी दिधलें,
इतुकेंच नाहीं विपरीत घडलें;—१
टाकुनि देशी सारे पुरुष ते,
त्वत्कृति विस्मित जग तें बघतें; २
बाळपणापासूनि मीं हृदयीं
ठेवीलें प्रेम तुझिये सुनामीं; ३
भावीत होतों संसारसुखाला,
कां गे! तुवां अंत गोड न केला ? ४
वरिन कुणा जरी, तुजची वरीन;
हृदिं या दुज्या ना ललने धरीन! ५
क्षत्रियपुत्र मी अक्षर खोटें
वदणार नाहीं या वाणिवाटे! ६—१३३

श्लोक.

नांदें सन्निध मी तुझ्या, जवळुनी कल्पांतिं ना गे निघें;
अंगाचे तुकडे करीं, तुडविं त्यां; माझा इथे प्राण घे!
देहा या तुजसाठिं आजिवरि म्यां रक्षीयलें सुंदरी!
मोक्षा जाइन मी तुवां वधियल्या, घे प्राण हा सत्वरीं! १३४

पद (संगीत सौभद्रः अंक २, यांतील
" बघुनि उपवना "–या चालीवर.)

ऐश्वर्या घरदारा सोडुनि तुज वरण्या पातलों!
पडतां डोहीं वांचविण्या तव प्राणातें धांवलों!
डोहाच्या तळिं बुडी मारुनी, जळिं सन्निध ठाकलों;
सांवरिली निर्जीव जणूं का; सुख मनिं बहु पावलों!
प्राणदान गे! तुज दिधलें म्यां, काय ह्मणुनि दुरवलों?
**नन्ना** धरिला मुळापासुनी, हतभाग्य ग! जाहलों;
॥ चाल ॥ देह तुझा हा नसेचि हें समजुनी, ।
स्वयें आर्पिशिल तूं तो मज, ह्मणवुनी ।
होशिल तूं मम भार्या सुखदायिनी ।
मानुनि मनिं गुणिं रूपिं न कमतर, तुज घ्याया पातलों!
प्रतिमा घोळे मनिं निशिदिनिं, तव नादें वेडावलों!
ऐश्वर्या घरदारा सोडुनि० १३५

श्लोक.

कितिहि वदशी 'नाहीं, नाहीं,' निराश न होइं गे!
निजमनिं धरीं ऐशी आशा, जरी तनु ही जगे,
वळशिल अगे माझ्या ठायीं तुझें मन लागुनी;
कर मजशिं दे, आलों, ठेलों, सुखा गृहिं त्यागुनी. १३६

पित्याचीहि इच्छा तुझ्या तैशि आहे,
कधीं बोलसि 'हो,' अगे वाट पाहें;
न आज्ञेविणें त्याचिया येथ आलों;
पहा पत्रिका लग्नि जैं सिद्ध झालों. १३७

अगे! मी तुझ्या कार्यी विघ्नें कराया
नसें येथ आलों; न हिंडा-फिराया;
तुझें कार्य चालो! असे हेचि इच्छा;
तुला गे वरावें, मनीं हीच वांच्छा. १३८

साकी.

ती वांच्छा त्वां पूर्ण करावी, ऐकुनि माझ्या बोला;
तूं जें इच्छिशि, मान्य मला तें, नेइन सर्व तडीला;
विचार करिं थोडा; **तूं मी जुळवूं ये जोडा.** १३९

श्लोक.

स्त्रियांचा तिरस्कारि मी ना असें तो;
स्त्रियां वंद्य मानोनि त्यां मान देतों;
मनीं बाळगीतों सदा हेचि आस्था,
घडो ती जशी योजिशी स्त्री-व्यवस्था. १४०

साक्या.

ऐकें नृपजे! जरि मी आहें पुरुष-कोटिचा प्राणी,
भूतदया मम हृदयीं वसते पूर्ण, मनीं हें आणीं,
साध्वी! मनन करीं। गणतों तुज मीं सुविचारी. १४१

कामीं काजीं, उठणीं बसणीं, अशनीं प्राशनिं, शयनीं,
झोंपत जागत स्वप्नीं तूं गे वससी संतत याचि मनीं;
अर्पीं कर मजला!। देइन सौख्य पुरें तुजला. १४२

आर्या.

क्रूरपणें स्त्रीजातिस पुरुष जरी ते अनेक वागविती,
क्रूरपणें म्यां स्त्रीशीं वर्त्तावें ही मुळीं नसे वृत्ती. १४३

**साकी.**

बाल्यापासुनि वृद्धावस्थेपर्यंत **न मी माझा;**
**तुझ्या** चिंतनीं राहणार मी सर्वस्वीं गे! **तूझा.**
दाई बाळपणीं । मज तव कौतुक ती वर्णी. १४४

**आर्या.**

जैशीं बोबडिं बाळें मागति चंद्रा करांत झेलाया,
तैसा बाळपणीं मीं मागतसें **इंदिरेशिं** खेळाया. १४५
पौगंडावस्थेमधिं उच्चा उच्चा स्थळीं ग! दिसलीशी,
तेजाची राशी तूं मज गुण—शिकविति सदाहि वाटलिशी; १४६
झुळझुळ दक्षिण वायू उत्तर देशाप्रती तदा आले,
माझ्या गृहांत, तैसे हृदयीं जावोनि ते तिथे खिळले. १४७

**श्लोक.**

सकाळीं दुपारीं तिपारीं किं रात्रीं,
वनीं मंदिरीं बागिं कीं नीरपात्रीं
ध्वनी—"**इंदिरा! इंदिरा! इंदिरा!**"—हा
सदा कानिं ये, पाडि अत्यंत मोहा! १४८

**दिंडी.**

हंसनायकही "**इंदिरा**" वदे तो;
शब्द तोही सागरीं व्योमिं येतो!
अगे! चांदणि होवोनि ग्रहां-माजी
नभीं असतिस, तरि तिथें भेटतों जी! १४९
नागलोकीं वा बनुनि नागकन्या,
तिथे मिळणारी नवरि मला धन्या

जरी असतिस तूं, तिथें तरी जातों;
तुला वरणें हा मुख्य मनीं हेतो ! १५०

श्लोक.

तारुण्याची प्राप्त होतां अवस्था,
लग्नाची मी बाळगोनीच आस्था
आतां तूझ्या मंदिरिं येथ आलों,
पाहोनीयां मी तुला पूर्ण धालों. १५१

या साऱ्या युवतींपुढें नचि शकें बोलूं मनीं वाहिं जें;
सांगूं इच्छितसें तुला, इथ तया मी ना कथाया धजें;
वाहीलें सुविचारिं आजिवरि जें लोभें तुझ्या स्वांतरें,
सांगावें तुज एकटीप्रतिच तें म्यां देवते इंदिरे ! १५२

केंद्रस्थ तूं मन्मनिं सूर्य होशी,
साऱ्या सुखाची मज पूर्ण राशी;
गे ! ऐक जें मी मनिं बाळगीं तें,—
जें ज्ञानियां विश्विं दिसोनि येतें. १५३

नांवाजलेलीं, बहु गौरवीलिशीं,
ग्रामें, स्थळें, स्त्रीपुरुषें जरी, तशीं
प्रत्यक्ष ना दर्शनिं पूर्ण भासती,
काळें कळों ये परि योग्य तत्स्थिती. १५४

तूं इंदिरे शोभशि गा तशी पुरी;
कालान्वयें वाटलिशी **बरी बरी**;
तूं योग्य भार्या वरणीय सुंदरी;
आशा तुझ्यार्थी दृढ होउ अंतरीं. १५५

त्वद्वर्त्तना देखुनि या सुमंदिरीं,
प्रेमा बळावे मनिं उत्तरोत्तरीं;
ऐकें, वदें विस्मय पूर्ण पावुन—
'त्वत्कार्यि साऱ्या तुजला ग रक्षिन.'

प्रत्यक्ष पाहोनि तुला ग! इंदिरे!
तूं योग्य भार्या, मनिं खास हें भरे;
प्रारंभि शीणोनि मनांत भंगलों,
आतां तुला जाणुनि दंग जाहलों! १५७

मातें वरोनी, करिं तृप्त या जिवा,
भावी सुखा जो तुज होइ सांठवा;
मातें वरील्या, ग! कृतार्थ होइन,
भार्येप्रती जें सुख इष्ट देइनें. १५८

ज्या ज्या बाळकथा तुझ्या परिसल्या, ज्यांहीं मना मोदिलें,
त्या त्या म्यां स्मरुनी इथे अनुभवें प्रत्यक्ष गे जाणिलें;
वारंवार तुला परीक्षुनि अगे! तूझ्याचि या मंदिरीं
केला पूर्ण विचार कीं जरि वरीं कोणा, तुलाची तरी!१५९

प्राणा या बळि सत्वरींच इथ घे तूं देवते इंदिरे!
पाडीं या तनुचे अनेक तुकडे, भावेल तैसे बरे;
मृत्यूला इथ देह अर्पिन, जरी तो ना तुला गे रुचे;
घालीं पायतणें तुझ्या सुपदिं गे! फाडोनि
माझ्या त्वचे. १६०

विदूषक.

जसा काळवीटा मृदू–गान–भोगीं
असे मृत्यु, येतां न तो त्यासि त्यागी,
परी गान ऐकें; म्हणे '**देह जाये,**
**तरी गानिं जावो, बिना ये बजाय्ये !'**
तसा मी ग ! राहीं तुझ्याही समोर;
मला मारुं वाटे, तरी तूं हि मार !
सुखें मी तुझ्या पायिं येथें मरेन;
न तूं मारिल्या, मी तुला गे वरीन ! १६२
जयीं पाहताहें तुझ्या या कृतीतें,
तयीं मारिं मातें, जरी इष्ट तूतें;
परी मारिल्या मागुतीं चर्म माझें
अगे लाविं संपूर्ण तें द्वारिं तूझे. १६३

दिंडी.

काळवीटासम पुन्हा मी वदें गे !
नको तूतें मी, तरी मारिं वेगें !
देह माझा हा करीं प्राणशून्य !
मला सुख ना तुजविणें उरे अन्य ! १६४
कोण माझ्याविण करी तुझी आशा
सौख्यभोगाची, भुलुनि तुझ्या पाशां ?
भिकाऱ्यां तूं कशि धनिक सौख्यदात्री !
**वरीं मजला गे ! प्रिये ! चारुगात्री !** १६५

श्लोक.

येवो मृत्यु मला अधींच, विधिनें तो भाळिं या लेखिला;
मातें जीव नको; कशा जगिं असो, जो त्वांहि अव्हेरिला !

माझा देह न हा, तुझाचि अवघा; **अर्धा** तुझ्यावीण गे!
राहें या जगतीं, जरी वरिसि तूं, मी पूर्ण तैं तो जगें! १६६

### आर्या.

गरिबां सौख्यद धन तें, आजाऱ्यां स्वास्थ्य जेविं वाटे तें,
तैशी मज वाटशि तूं; किति सांगूं या मनासि सुख होतें. १६७
किति जरि '**ना! ना!**' ह्मणशी, बहु आणोनी मनांत अविचार,
पुरुषा त्यजिण्याचा तो व्यर्थ म्हणें घेशि तूं शिरीं भार. १६८

**अग मज पुरुषा** वाटे कीं व्हावें म्यां निराश नाचि कदा,
परि बुद्धि–वादिं तुजशीं लढुनि वरावें तुझ्याचि गे सुपदां!
तत्प्राप्त्यर्थ जरी ये मरण तरी ही सुखेंचि येवो तें!
तुज-सम-भार्या–साधनिं ह्मणतों वेंचीन सर्व आयूतें." १७०

असें ह्मणुनि देइ तो करिं तिच्या जुनी पत्रिका,
तिच्या सुजनकें तया दिधलि शोधण्या कन्यका;
तया धरुनि पत्रिके, करि बहू सती क्रोध ती;
न ती उघडितां, धरेवरति आपटीते सती. १७१

### साकी.

ऐसें पाहुनि चंद्रकेतु तो गुडघा टेंकुनि राहे
इंदिरेचिया पायां पाशीं; तन्मनिं प्रेमा वाहे;
पत्रा फेंकील्या, हातीं धरितो तिज घाया. १७२

### श्लोक.

जसा पूर पाण्याचिया रुंद पाटीं,
चढे लाट लाटांवरी, होइ दाटी;
तसे शब्द येती तिच्या कंठनाळीं,
महाओघ कीं लोटतो त्याचि वेळीं. १७३



मुखांतूनि येणार आतां फुटोनी
अती क्रुद्ध वाणी, असें ये दिसोनी;
पडे नाद तों कर्णि, कल्लोळ माजे;
स्त्रिया बोलती भोंवतें सैन्य गाजे. १७४

साक्या.

झंजा–मारुत येउनि जैसा उडवितसे फुलपाना,
नानारंगी नानारूपी नाचवि आकृति नाना,
तैशा तिथ नारी, । गेल्या भिउनी अंतरीं. १.

कोणी ह्मणती सैन्य पातलें, नगरा वेष्टि सभोंतीं;
कोणी ह्मणती येऊं द्या तें, काय घडे त्या–हातीं.
ऐशा घोंटाळीं । पडलें मंदिर त्या वेळीं. २. १७५

श्लोक.

क्रोधें तप्त जहालि ती परिसुनी ऐशा वृथा कल्पना;
आवेशें खिडकीशि येउनि सती सोडोनियां आसना,
बोले त्या सकळ–स्त्रियां–प्रति कटू शब्दीं बहू ताडुनीः–
"कां ऐशा मतिहीन आजि बनलां, गेलां भयें नाडुनी? १७६

आहे स्वामिण मृत्युनें तुमचि का आजीच ती ग्रासिली?
कार्यें का तिचियांत शक्ति नुरली रक्षावया आपुलीं?
मी, मी, मी अजि मी पहा जगतसें, साहीन मी एकटी
साऱ्या त्या नरसायकां; युवतिंनों! रक्षीं तुह्मां संकटीं! १७७

युद्धा जाइन मी, लढेन समरीं मत्कार्य रक्षावया;
येतां मृत्यु रणीं तिथेहि लढतां अर्पीन देहास या;
घेवोनी करिं कार्य यापरि महत् सप्रेम तें एकदा,
त्यागी का कुणि त्या मधींच? कृति मी त्यागीं न माझी कदा.

ही भीती मनिं बाळगा अशि फुका, अन्याय ना तूमचा,
झाली आजि सहस्र–वर्ष–गति कीं दासत्व अस्थित्वचा–
माजी हें खिळुनी, तुह्मी सकळ त्या झालां असा भ्याडशा;
काळें निश्चय पालटेल, तुमची दुःखास्पदा ही दशा. १७९

रहा गे उग्या सर्व! कल्लोळ कां हा?
महानर्थ ऐसा फुका मांडिताहां?
तुह्मांलागिं देईन मी हांकुनीयां!
स्वधामास जा! घालवा जन्म वायां. १८०

वहावा तुह्मीं तो जळघट शिरीं पूर्ण भरला;
भरोनी त्या हातीं, जरि तनुमधीं प्राण उरला,
धुवावें, चोळावें, निसण-टिपणा नित्य नियमें
करावें; हें तुह्मां रुचत बरवेंसें मज गमे. १८१

तुह्मां हें न शोभेचि स्वातंत्र्य साचें;
तुह्मां गोड तें दास्य वाटे नरांचें;
कराया सदा आवडे त्यांचि सेवा,
जणूं स्त्री-सुखाचा नरां–हातिं ठेवा! १८२

बसा बोलती ते, तदा हो बसावें;
उठा बोलती, तैं तुह्मीं हो उठावें;
जसें नाचवीती, तसें सर्व भावें
सदा नाचुनी आयुषा घालवावें.” १८३

ऐकोनि वाणी अशि इंदिरेची,
गर्दी निमाली तिकडे स्त्रियांची;
झुंडी तयांच्या फुटल्या समस्त,
संग्राम ज्या ऐकुनि भीतिग्रस्त. १८४

हंसति करुनि मुद्रा इंदिरा राजपुत्रा
मधुर वच कृतज्ञा बोलली चारुगात्राः-
"नरवरमणि रे तूं शोभसी दिव्य साचा,
खुलविशि कुळकीर्ती; वर्ग तैसा नरांचा? १८५

कधिं तव उपकारा अंत येणार नाहीं,
निजतनु जगताहे युक्तिमात्रें तुझ्या ही;
परम करुनि धैर्या प्राण हा वांचवीला,
मम कृतिस तुझा तैं साह्य बा देह झाला." १८६

मग घडीमधिं ये तिज विस्मृती,
नृपसुतें स्वकरीं नदिमाजि ती
सुतनु रक्षिलि सद्गुणि सुंदरा,
परम वंद्य स्त्रियां प्रति इंदिरा. १८७

आर्या.

निजदेहाचें रक्षण झालें नृपसुतकरीं जरी होतें,
धिक्कारयुक्त शब्दां योजुनि नृपजा तदा वदे त्यातें:-१८८

श्लोक.

"बहुत वसनिं या रे शोभसी राजपुत्रा!
कृति मज नुमजे त्वां केलि कां ही विचित्रा;
समर करुनि न्याया आणिलें काय सैन्य!
नवरि करुं पहाशी, काय हें थोर दैन्य!" १८९

अशि विडंबुनि ती वदतां तया,
स्मरण ये, कृति पावावि तो लया;
स्मरणिं त्या क्षणिं होइ उदास ती;
कळवळोनि बहू वदली सती. १९०

"जळिं तरि बुडलीना माझि कां सर्व काया !
परम करुण दैवें प्राण हा वांचवाया
अवचित तुज कां तें धाडिलें योग्य काळीं ?
नवरि करुन नेण्या ? दास्य येण्या कपाळीं ? १९१

पद. राग खमाज ताल त्रिवट.

("अवचित त्या उपवनीं करुणासागर दृष्टिस पडला—")
या चालीवर. [ सं० सौभाग्यरमा नाटक. ].

वरण्या कीं तव दासी करण्या इच्छिसि तूं हे नृपतनया !
परहस्तीं का तनु ही द्यावी निजकार्यातें मोडुनियां ? ध्रु०
वरतां तुजला मम स्वातंत्र्या अंत अकाळीं येउनियां,
हानी सारी निश्चित होइल, थोर निराशा स्त्रीजनिं या !
वरण्या कीं०
अमोल काया काय फुकावी नित्य गुलामी करोनियां ?
पुरुषांचे विण गत्यंतर ना, काय ह्मणावें याचि नया !
वरण्या कीं० १९२

श्लोक.

ह्मणसि काय रे लग्न योजिलें ?
कृतिस कोणिं रे ! या रुकारिलें ?
जनक-कृत्य हें ना रुचे मला,
न विकिली असें जाण तें तुला. १९३

विशाळा ऐशी ही पृथिवि घटती हेममय ती
तया हेमाचा रे मुकुट करुनी, त्याहि वरती
नगांचे साऱ्याही बनवुनि हिरे त्वां जडविले,
तरी ना तद्लोभें मम मन वळे; पूर्ण ठरलें. १९४

पंजाबी ठुंबरी. राग केसुरी–ताल त्रिवट.

वर मिळवाया लग्न करावें,
सासरिं स्वातंत्र्यचि बुडवावें. ॥ ध्रु० ॥
सुदैव तें, जरि माउलि सासू;
सदैव ना तरि नयनीं आसू; १
नणंदेच्या परिसावें घसऱ्या;
चाहड्या नाशिति सासुसासऱ्या;२
व्यर्थ मत्सरें भांडति जावा,
भांडविती मग भावांभावां; ३
इतुकें सोसुनि, पतिची जरि कां
प्रीत नसे, तरि आयुष्य फुका; ४
कोण विवाहित, सासुरवासा
सासूच्या ना जाणत लासा? ५
नांवाकरितां अंगावरतीं
दागदागिना लादुनि देती; ६
परि दासत्वा पार नसे तो,
हा अनुभव रे लग्नीं येतो! ७ १९५

पद. राग हमीर, ताल त्रिवट.
( असो धिग धिग–या चालीवर ).

नसे तिळभर भीति का जिवाला—
येवोनी मागशी तूं मजशी वरण्याला? ध्रु०
दिसे घोर उडी ही रे तुझि मजला;
आलासि कां व्यर्थ इथे आजि मरण्याला? नसे
तिळभर० १ १९६

### श्लोक.

अरे निघुनि आलिया परत मार्गिं जाईं सुखें!
न पाहवत हें तुझें वदन कज्जलासारखें;
स्वरूप बदलोनियां करिशि वेष हा मीपणें
मलाचि फसवावया; फसशि तूं स्वयें;धिग् जिणें! १९७

अगे कोण आहे तिथे? यास दावा
गृहीं जावया मार्ग! वाटेस लावा!
नको लांडगे येथ हे क्रूर-दृष्टी,
करा यांचिये पृष्ठिं हो मुष्टि-वृष्टी." १९८

वाणी ऐकुनि क्रुद्ध ऐशि, निघती तेथोनि आठ स्त्रिया,
अंगीं ज्या बहु धष्टपुष्ट दिसती, ज्या जाणती ना दया;
त्यांनीं घट्ट धरोनि दोन नट ते लोटीत नेले सवें;
गेले हिर्मुसले; अपार हंसल्या त्या नारि एक्या रवें! १९९

### दिंडी.

अंत वेषाचा शोचनीय झाला;
वधू-प्राप्तीचा फुकट काळ गेला!
परी आशा नचि जाइ अंतरींची,
गेलि कोंदुनि मनिं मूर्ति इंदिरेची. २००

चवथा सर्ग समाप्त.

---

# संगरनामक सर्ग पांचवा.



### दिंडी.

मंदिराच्या बाहेर लाविलेले
मित्र गांवाच्या शिवेपार गेले;
मार्ग धरिला तयिं थेट उत्तरेचा,
दिसत होता जिथ थाट संगराचा. १

### श्लोक.

जिथे स्थापिलें सैन्य सत्यध्वजानें,
तिथे पातले दीन झाले श्रमानें;
शिवेंपाशिं येतां तया छावणीचा
पुसे त्याजला गाडदी पाहऱ्याचाः—२
"असां कोण दोघी, कुठे जात आहां?
कशा येथ आलां? खुलासा करा हा."
ह्मणे चंद्रकेतूः—"अहो मैत्रिणी हों,
इथे राजभेटीप्रती पातलों हो." ३
ह्मणे गाडदीः—"जा तुह्मां भेट होई,
महाराज ते बैसती तंबुठायीं;"
दिला तंबु दावावयाला शिपाई
तया गाड्यानें, करूनी भलाई. ४

निघुनि तिथुनि जाती तंबुच्या थेट वाटे,
स्थळ जिथतिथ दाटे तंबुच्या शुभ्र थाटें;
नर-गणि गुणि योद्धे वीर ते सर्व आले,
सकळ वसति डेऱ्यांमाजि ते आपुलाले. ५

तंबूंत आले मग ते सुमित्र;
बैसे जिथे राय, तिथें सुपुत्र
प्रेमें उभा जोडुनि हस्त ठेला;
साष्टांग राया प्रणिपात केला. ६
जसे तंबूमाजी युवति-वसनीं मित्र शिरले,
तयांच्या रूपाला सकळ बघुनी वीर हंसले;
श्रमानें रात्रींच्या विसकळित पोशाक सगळा
असे झाला; अंगावरि उधळला मार्गीं धुरळा. ७

दिंडी.

जळें रायाचे नेत्र भरुनि गेले,
उडुनि गेलेले प्राण पंच आले;
पुत्र पाहुनि मनिं राय पूर्ण धाला;
समर केल्याविण पुत्र करीं आला. ८

श्लोक.

बघुनि निजसुपुत्रा राय बोले गजेंद्रा:—
"निजगृहिं अजि जावें ये क्षणीं हे नरेंद्रा!
सुरळित मम आला पुत्र हा चंद्रकेतू;
तदुपरि इथ तुह्मां ठेविण्या नाहिं हेतू." ९
तदा न्याहळोनी स्वपुत्रा वदे तो:—
"अरे काय हें रूप बा चंद्रकेतो!
कुठे रंग गेला, कुठे तें शरीर!
वधू-शुद्धिला हे किती यत्न घोर! १०
जा बाळा, उतरोनि वेष अणि हा, राहें उभा संगरा;
ठेवीं एकिकडेस हा युवतिचा संभार, ना साजरा;
केलीसे शशिनें निवेदन कथा साद्यंत पुत्रा मला;
आले बंधु तिचे, तयां समरिं तूं जिंकावया जा भला."११

सुत वदे पित्याः—"करुनि काय तो संगर?
ऽ कुमरी कशी? वदुं शके न कोणी नर;
ः जरि पावलें, तरि तिचें मिळे का मन?
त मनिं तो जरी, तरि वृथा सुभार्या-धन." १२

साकी.

नि ऐसें पित्यास विनयें, डेऱ्यांतूनि निघाला;
ासाठीं तंबु मागवुनि मित्रासह तिथ गेला;
ाषा उतराया, । युद्धा सिद्ध तदा व्हाया. १३

श्लोक.

ासा तो विद्यार्थी स्वमनिं अपराधा स्मरुनियां,
ुरू देखीयेल्या लपत असतो पावुनि भया,
से ते दोघेही लपत समुदायांत निघती;
ियांच्या वस्त्रातें शरमुनि मनीं शीघ्र पळती. १४

तदा नारिवेषा त्यजोनी, पुन्हा ते
नरांसारखे घेति शस्त्रें स्वहस्तें;
नरांचा नरां वेष जो नित्य साजे,
झणीं त्यांहिं केला; नरश्री विराजे. १५
असे जाहली या घडीं सुप्रभात,
रवी रश्मिनीं पूर्व ती शोभवीत;
निघाले पुढें जावया श्रांत-गात्र,
शशी भेटला तों, तिथे प्राणमित्र. १६
ओशाळला तैं शशि पूर्ण रीतीं,
केल्या कृतीची जिविं फार भीती;
केली क्षमा त्यांहिं परस्परांतें—
जो मारि, जो गाइ अभद्र गीतें. १७

पुन्हा तिघे भेटति एक ठायां
विशेष तैं स्वानुभवा कथाया;
तदा वदे तो शशिः– "ऐक आलों
कसा इथे, छावणिमाजि ठेलों." १८

ह्मणे:—"मद्याच्या रे प्रबळ बहु मादें तुडविला
बुझालों; चिंतेनें भ्रमण करितां देह दमला;
पथीं जातां जातां प्रिय कमलजा भेटलि मला;
इथे आलों दोघें; चल, जिथ तिचा देह पडला. १९

न बोलेचि कांहीं, न कांहींच लक्षी,
न पाणी पिई, अन्नही ती न भक्षी;
असे चालवीली क्रिया रोदनाची,
स्थिती जाहली ऐसि तीच्या मनाची." २०

पडलि जिथ असे ती, पातले तेथ सारे;
बघुनि तिज निचेष्टा, दुःखिता या प्रकारें,
द्रवति सुहृद चित्तीं; बंधु बैसोनि पाशीं,
उचलुनि भगिनीचा हस्त घेई उराशीं. २१

"भगिनि गे! नयनें उघडीं भली,
पडुं नको अशि गे, तनु कोमली;
करिशि काय? तुझा नचि दोष तो;
भगिनिहस्त न बंधुसि मारितो. २२

पद. राग काफी, ताल दीपचंदी.

( "भोलानाथ दिगंबर" या चालीवर. )

घडलें जें आजि घडों दे तयातें, कां खिन्न होशी अशी?
भगिनी, कां खिन्न होशी अशी? ध्रु०
गतगोष्टीचें, मनन करोनी । व्यर्थ हृदीं ही हाय धरिशी?
भगिनी, कां खिन्न० १

निजबंधूचा, नृपतनयाचा । प्राण कधीं का हरिशी ?
भगिनी० २
शपथ मोडिली, ठीकचि झालें, । होत्ये ती पूर्ण कशी ?
भगिनी० ३. २३

**श्लोक.**

ह्मणे कमलजेप्रती नृपकुमार तो कोमळः—
"अगे सुतरुणी नको हृदयिं होउं तूं विव्हळ;
मनासि करिं शांत तूं; मजहि काय धोका नसे ?
वधूसि मुकलों पुरा ! कशि ग इंदिरा ती दिसे ?" २४

**दिंडी.**

तिनें आयकिली राज-तनय-वाणी;
स्फुंदस्फुंदोनी नयनिं ढाळि पाणी;
पदर सांवरुनी मुखावरी घेई;
उठुनि बैसे, जिथ पडलि तेचि ठायीं. २५

पद. जिल्हा झिंझोटी, ताल दादरा.
"दुर्धर या वैधव्यव्रता केविं आचरूं" या चालीवर.
[ सं. सौभाग्यरमा नाटक ].

"हर ! हर ! हर !" ह्मणे काय घात असा केला ? स्वामि-
णिच्या कार्याचा हिरमोड झाला ! ध्रु०
काय अशी पापिण मी, । दुर्दशाचि सकळ कामिं । करुनि
कलह निजधामीं । घोर मांडिला; हर ! हर ! १
स्वामिणि मज अंतरली; । काय अशी बुद्धि भ्रमली; ।
जागा जगिं मुळिं नुरली । तोंड दाविण्याला ॥ हर० ॥ २६

**श्लोक.**

मोडियलें म्यां सद्वचना, । दावुं कसें हें तोंड जनां !
रक्षियलें माझ्या अनुजा, । नाशियलें तैं व्यर्थ दुजां. २७

### साकी.

शशिवदनें तिज ह्मटलें:—"साध्वी न करीं गे! तूं खेदा;
शांत राहिं तूं, जें झालें तें ना हो कारण वादा;
मुलीकडे पाहें; । तिचियासाठीं जगिं राहें". २८

### श्लोक.

परिसुनि तयिं नामा आपुल्या अर्भकाच्या,
ढळ ढळ रडुं लागे, ना शके वर्णु वाचा;
तटतट कच तोडी, धाय ती मोकलूनी;
धडपड जिविं लागे, कंप अंगीं सुटोनी. २९
बोले:—"बाले कमलवदने! वत्सले माझिये गे!
आलें नाहीं मनिं, किति तुझे हाल होती वियोगें!
हातांतूनी निजपदरिंचें घालवीलें सुरत्न,
आतां कन्या परत मिळण्या मी करूं काय यत्न! ३०
टाकीलें म्यां तुजशिं तिकडे, काय चांडाळ माता!
माझी कन्या ह्मणुनि तुजला दोष गे येत जातां
देवोनीयां पिडितिल सदा, निश्चयें जाणतें हें;
कैशी बुद्धी उपजलि अशी! दैन्य मातें न साहे. ३१
ह्मणतिल तिचि होती माय ह्या ह्या प्रतीची;
करितिल मम निंदा तोडण्या प्रीत तीची;
उडवुनि मन तीचें स्वीय माते—वरोनी,
करितिल तिज दुष्टा, कर्ण तीचे भरोनी. ३२
मग मज कधिं ना ती ओळखीणार बाळी!
जरि कधिं वळखीलें कोणाच्याही सुकाळीं,
वळखिल, परि बुद्ध्या दूर राहील बाला,
कृति अशि घडल्या का सौख्य वाटे मनाला? ३३

चुकी थोर झाली सुते टाकियेलें
तिथे एकटीला; कुठे चित्त गेलें?
जये वेळिं कल्लोळ केला स्त्रियांनीं,
मुळीं भान गेलें; तिथे सर्व ध्यानीं. ३४

द्वारीं जाउनि बैसतें रडत मी त्या राजकन्येचिया;
मागोनी मम कन्यका, उठवितें पोटीं तिच्या मी दया;
आक्रोशें रडुनी तिथे गडबडां लोळेन भूमीवरी;
नाना अन्य उपाय योजिन असे कीं ती द्रवे अंतरीं. ३५

नाहीं मी उठणार तेथुनि जरी कन्या न माझी मिळे;
घेवोनी मग बाळका मधुर त्या चुंबीन मी मंजुळे;
हा कन्ये मधुरे सुरम्य-वदने! हा वत्सले कोमले!
माता दुष्ट किती तुझी, परकरीं कीं तूजला टाकिलें. ३६

ऋणी जन्माची तो करिल मज, जो देववि सुता;
अहो जन्मोजन्मीं स्मरिन उपकारांसि विनता;
विनंती माझी जो परिसुनि करी साह्य, करवी,
तयाच्या मी सार्‍या सकळ मनिंचे हेतु पुरवीं." ३७

"नको खंती होऊं" शशिवदन बोले तयिं तिला:—
"प्रिया कन्या तूझी कमळवदना देववुं तुला;"
सुखाची वाणी ही परिसुनि पुन्हा भूमिवरती
पडे; मूर्च्छा आली; मग कमलजा हालत न ती. ३८

अहो पोटचा जाळ का अल्प आहे?
वियोगाग्नि का सारियांलागि साहे?
कुणाचीं कितीही मनें दुष्ट होती,
परी पोटिंचें बाळ ना त्यागिती तीं. ३९

---

दिंडी.

काय छावणिमधिं वर्त्तमान झालें,
पुढें परिसा तें काय घडुनि आलें;
बंधु तेथें तो दिव्य इंदिरेचा
करुनि आला संकेत संगराचा. ४०
इंदिरेचा प्रिय वीरभद्र बंधू
खऱ्या धैर्याचा पूर्ण शौर्य-सिंधू
भगिनिकार्याचा जेथ नाश झाला,
पारिपत्याकारणें तेथ आला. ४१

श्लोक.

चंद्रकेतु हें वृत्त ऐकुनी,
मूर्च्छितांगना तेथ ठेवुनी,
मित्र संगतीं घेउनी निघे;
रंगभूमितें पावती तिघे. ४२

राजे दोन्हि तिथें करीत बसती संवाद लग्नाविशीं;
"पुत्रातें तनया विवाहिं" ह्मटलें सत्यध्वजें "दे कशी;
देवोनी बहु लाड रे तिज नृपा वेडाविलें त्वां अधीं,
आतां एवढि मातली न धरितां येणार हातीं कधीं. ४३
नरां सारियां सर्वदा तुच्छ मानी,
जगाची करी आपुली तेविं हानी;
करी भग्न माझ्या सुताचीहि आशा;
ह्मणे 'ना,' तरी युद्धिं पावेल नाशा. ४४
करूं युद्धसंग्राम तीतें हराया,
नृपा! गाजवूं जाण शस्त्रें करीं या,
हरूं गर्व तीचा, करूं पारिपत्य,
करूं लग्न रे, देवुं तीतें अपत्य." ४५

**साकी.**

गजेंद्रनृप या परिसुनि वचना चंद्रकेतुला बोले:-
"वाटतसे मम बाळेच्या गृहिं असतिल हालचि झाले;
लोभ तिचा धरिशी, । वद कीं संग्रामा करिशी". ४६

**श्लोक.**

"नसे संग्रामाची मम हृदयिं इच्छा मुळिंच ती,
न तो ये हो कामीं" नृपतनय बोले निजमती;
" न होई कल्पांतीं कुशळविधि ऐशाहि दुरितीं;
गमे, लग्नासाठीं समर करितां, त्या न सुगती. ४७
आधींच मी तिज दिसें नर दुष्ट खोटा,
संग्राम तो घडलिया मग पूर्ण तोटा;
साऱ्या नरां-पदरिंचें मज डोइं पाप
येईल; होइल पुरा मम कार्यलोप. ४८

**दिंडी.**

तिच्या कार्याच्या आड पुरुष येई,
पूज्यबुद्धी तिचि नुरे तया-ठाईं;
जरी कोणी विध्वंसि तिच्या कार्या,
तया पुत्री धिक्कारि तुझी आर्या! ४९
रक्तपातें हें काम होत नाहीं,
तोफभडिमारें वा न सायकांहीं;
हृदयिं प्रेमाचे पाहिजेत गेले
बाण कोमळ, तिथ भिडुनि राहियेले. ५०
तिच्या प्रेमाची मज असे अपेक्षा;
लग्न न रुचे मज किमपि नाहिंपेक्षां;
वरुनि काय करूं? जीस नावडें मी;
कशी शांती नांदेल अशा धामीं! ५१

विश्व पालथिलें, जलधि शोषियेला,
अद्रिअद्रीचा चुरा जरिहि केला,
अतुल ऐशा जरि बळा दावियेलें,
ह्मणुनि काय तिचें प्रेम साधियेलें? ५२

धरुनि बांधियलें, गुलामही केलें,
ह्मणुनि काय तिचें हृदय जिंकियेलें?
जरी संगरिं ती हरुनि बद्ध जाई,
तरी मानस का तिचें साध्य होई? ५३

श्लोक.

जो जो सायक जाय येथुनि, सुटे जो बार बंदूकिचा,
लागो तो न कुणा, करू नचि इजा, होवो न तोटा तिचा;
ते ते अंतर पाडतील अवघे आह्मांमधीं निश्चित,
लग्नाचा मुळि हेतु जाइल वृथा, हें मी करीं भाकित." ५४

सुतास वदला पिता, करुनि कोप, सत्यध्वज:—
"अरे बटु-विचार हे पडति कामिं ना, ते त्यज;
मुला! वळखशी न तूं, परम गूढ हा स्त्रीजन;
जगीं फिरुनि पाहशी, तरिच पालटे त्वन्मन. ५५

असे नर सुपारधी, सुखद नारि त्या पारध;
जगा वळखिती पुरे, सकळ बोलती ते बुध;
रुपा भुलुनियां, तिची नर करीतसे पारध;
त्वचे भुलुनि, पारधी करि जसा मृगीचा वध. ५६

अरे या स्त्रिया शूर-वीरां पुजीती,
बळा बाहुच्या जे तयां दाखवीती;
नसे जें स्त्रियां-अंगिं तें शौर्य दावी,
असे तो स्त्रियां वंद्य धीर-स्वभावी. ५७

**दिंडी.**

काय वाघीण किं सर्प कुण्या काळीं
कोष्टियाच्या धरुं पकडुं येत जाळीं ?
प्रेमपाशीं का इंदिरा मिळे ती ?
जिंकियेल्याविण न ती येइ हातीं." ५८

**श्लोक.**

बोले राजकुमार तैं स्वपितयाः–"स्त्री–जातिचे पारखी
आहां; तात ! वदाचि, एक असते स्त्री का दुजी सारखी ?
पुष्पांमाजि जशीं गुलाब बकुळी जाई जुई मोगरी
चांफा जास्वन पारिजातक, तशा होती स्त्रियांच्या परी.५९
कोणी शीतल शांतशा सुमधुरा अत्यंत सुप्रेमळ,
शब्दें आचरणें जनां सुखविती, चित्तीं सदा निर्मळ;
कोणी केवळ भांडखोर बसती भांडोनि कोनाफटीं;
कोणी लाविति शीघ्रकोपि, जिकडे जाती तिथें आगटी. ६०
कोणा संगर आवडे; रणिं पडे वा शत्रुला पाडितो,
तो वाटे वरण्यासि योग्य कुणिकां, जो मृत्युशीं भीडतो;
कोणा आवडती गृहें; कुणि तिथे बाळांमुलांभीतरीं
आनंदें रमती; अशा असति हो नाना स्त्रियांच्या परी. ६१

न का युद्धालागीं प्रबळ दिसते राजतनया !
असे अंगीं तीच्या बळ निकरिं जें ये समुदया;
महा–शौर्याच्या ती सकल मनुजां लाजवितसे;
नखीं जैसा कान्हू गिरि उचलितां, ही तशि दिसे.६२

पहा इंदिरेची कृती काय मोठी !
जणूं सृष्टिला शेष घेई स्वपृष्ठीं !
करा हो मनीं अल्प, ताता ! विचार,
किती स्त्रीजना दुःख देतों अपार. ६३

कसे वागवीतों स्त्रियां दुष्टरीती!
नसे कोणि शास्ता, जिवातें न भीती;
नसे बोलणें इंदिरेचें खरें का!
स्त्रिया सर्व त्या मारिती का न हांका! ६४
न का स्तुत्य हेतू असे इंदिरेचा!
न कां तथ्य जाणां? तिची सत्य वाचा;
अहो वागवीतों स्त्रियां योग्य रीती,
तरी मागणें आज कां हें करी ती?" ६५
गजेंद्र बोले "वदसी खरें तूं;
असे कुमारी–मनिं योग्य हेतू;
असे तिची वाणि परी कठोर;
खरें तुझें वाक्य सुयोग्य थोर. ६६
किति तरि सुख होतें माझिया अंतराला!
तुज जरि वरिती ती योग्य वीरास बाला,
वर तिज मिळुनीयां, इष्ट तूतेंहि तैशी
उचित अशि वधूटी प्राप्त होती सुवंशी. ६७

दिंडी.

परी अनुरक्ता तुजवरि ती नाहीं,
थोर माझें दुर्भाग्य तिचें तेंही!"
चंद्रकेतूला नृप गजेंद्र ऐसें
वदुनि, परिसा तत्पित्या ह्मणे कैसें:– ६८

श्लोक.

"अरे आलासी तूं अजि नृपवरा युद्ध करण्या,
मला ठेवीलेंसी इथ नजरकैदेंत बसण्या;
तुझा आतां आला तनय परतोनी तुजकडे,
तया घेई राया; मम शिरिं न जें यावरि घडे. ६९

मजवरि उपकार त्वां नृपा थोर केला;
सतत, नृपति! माझा मानही राखियेला;
कधिं मम अपमाना कोणच्याही प्रकारें
स्वकर-परकरें वा नाहिं केलें तुवां रे! ७०

पद. ("आला वनमाळी रात्रीं"—या चालीवर.)

धाडीं माझ्या संगें आतां, पुत्र नृपा आपुला;
देतों त्यातें माझी कन्या, निश्चय मी पूर्ण केला.॥ध्रु०॥
घेउनी जातों तेथें सांगातें मी त्याजला,
वीरभद्र जेथें आहे संगरास पातला;
वीरभद्र पाहूं काय सांगतो या वेळीं मला,
त्याचाहि विचार घेऊं, जाणे पूर्ण इंदिरेला;
करोनी विचार आह्मी काढुं योग्य युक्तिला;
बंधु सांगे तैसें करणें भाग पडे भगिनीला; ॥ १ ॥
धाडीं माझ्या०. ७१

दिंडी.

बंधुवचना ती नाहिं मोडणार;
असे बंधूवरि भगिनिभाव थोर;
बंधु सांगे तें भगिनिला प्रमाण,
बंधुकरितां अर्पील पंच प्राण.७२

साकी.

कमलाक्षा, शशिवदना, तुह्मिही आह्मांसंगें यावें;
पंचक आपण विचार करूं या, आतां काय करावें?
कांहीं युक्ति सुचे, । न जाणों, वळवूं मन तीचें." ७३

श्लोक.

असें ह्मणुनि राजिया, धरि गजेंद्र हातीं तिघे
सुमित्र; मग जावया निजसुतेकडे तो निघे;
"करा सफळ कार्य हें शुभ" वदोनि सत्यध्वज,
शिरीं स्वतनयाचिया वरद हस्त ठेवी निज. ७४
निघाले मार्गीं तैं, जिथ तिथ दिसे रम्य वसुधा;
वसंताची शोभा सुखवि नयनांलागिं विविधा;
स्वसंतोषीं नाना गढुनि फिरती पक्षि गगनीं,
तरूमाथीं मंजुस्वन करिति ते गान बसुनी. ७५

दिंडी.

रंग आकाशीं विकसले अनेक;
सुहृद रमविति मधुवचें एकमेक;
लतापुष्पें सुखविती जागजागीं;
चंद्रकेतुस ना चैन अंतरंगीं. ७६
शांत भोंवति तें सर्व शोभताहे,
समर-चिंता तो मनीं तदा वाहे;
वधूप्राप्ती ज्या भरुनि चित्तिं गेली,
काय होई त्या सृष्टि विकसलेली? ७७
अंधबधिरासम चालला असे तो
मननिं गढलेला; चित्तिं एक हेतो,
केविं संगरिं ती होइ यशःप्राप्ती ?
मिळे जाया कीं अंतिं न ये हातीं ? ७८

श्लोक.

सामोरे इतक्यांत धांवत तिघे तैं स्वार ते पातले;
राजा देखुनियां गजेंद्र अपुला, हर्षें तिघे गर्जलेः—
"राया ! व्हा विजयी !" "तुह्मा कुशळ हो !" राजा वदे त्यांजला;
आला राय गजेंद्र तो सुखि पुन्हा, आनंद तैं गाजला. ७९

तिथां मध्यभागीं उभा वीरभद्र.
जिथे जाइ तेथें करी सर्व भद्र;
महा-बाहु-दंडें सजे शूरमूर्ती;
रणीं गेहिं गाजे तयाची सुकीर्त्ति. ८०
तिथे बंधु हे इंदिरेचे सुवीर
तिच्या कारणीं प्राण देण्या तयार;
विडा घेउनी इंदिरेच्या कृतीचा,
उभाला रणीं बंधुंचा वर्ग साचा. ८१
त्रिपुत्रांसि एकीकडे नेउनीयां
ह्मणे राय, "कां युद्ध येथें कराया
तुह्मी पातलां हो? कशा हे विचार
मनीं आणितां? दुःख ये जैं अपार. ८२
नको युद्ध हो तें महा-शोक-कारी,
जिवा नाशि, पाडी जनां व्यर्थ हारीं;
नको जोडपें जोडण्या प्राणहानी;
विवाहासि द्यावे बळी कां जनांनीं?" ८३

युग्म
परिसुनि जनकाचे शब्द ते, वीरभद्र
स्फुरत बहुत बोले, तापला जेंवि रुद्रः-
"दडवुनि जनका हो! आपणां आज काळीं
चमुसह नगरी जैं वेष्टिली दुःखशाली, ८४
समरिं करिन त्यांचें योग्यसें पारिपत्य;
भगिनि-कृतिस द्यावी पुष्टि; हो हेतु स्तुत्य!
सकळ भगिनि-वाणी सार्थ मातें गमे ती;
नरकरिं बहु दुःखें भोगिते नारि-जाती. ८५

इथे आणोनी तो प्रबळ चमु सत्यध्वज करी
उगा संग्रामातें; यश न कधिं येणें तदुपरी;
मला भीती आहे अजि कवण संग्राम करण्या?
कधीं कोणा नाहीं भगिनि मिळणें माझि वरण्या. ८६

स्वभावें कोपी ती, कठिण ह्मणुनी काढि वचना;
असे योग्या वाणी परम असिया दुर्धर जनां;
नरां-हातें का ना जगिं अमित अन्याय घडती?
स्त्रिया जैं शोकाच्या जलधिमधिं त्या पूर्ण बुडती. ८७
असे शपथ वाहिली भगिनिकार्य साधीन मी;
सदा पुरुषपाय ते गरिब बापुडी स्त्री नमी;
स्वयें करिन शासना, जरि दिसे न शास्ता कुणी;
स्वतंत्र करण्या स्त्रियां झटत इंदिरा सद्गुणी." ८८

दिंडी.

वाणि ऐकुनि ही, चंद्रकेतु कांहीं
वीरभद्रातें बोललाचि नाहीं;
तिघां भ्रात्यांहीं अर्थ काढियेला,
चंद्रकेतु किं तो भयाभीत झाला. ८९

श्लोक.

युग्म
ह्मणे चंद्रकेतू मनीं–'युद्धयोगें
कशा वैमनस्या दुणावें निजांगें'?
तदा बोलला एक त्या बंधुंतूनी
पिळोनी मिशा, तोंडिं 'धिक् धिक्' वदोनीः—९०
"जसा वेष केला, तसें अंतरंग;
असा वीर, दावा तरी तेंवि रंग.
अहो भ्याड कां जाहलां आजि ऐसे?
चला, शौर्य दावा, लढा शूर जैसे! ९१
जो कंकणें करिं धरी ललनेपरी, तो
दावी कसा? कुठुनि त्या पुरुषार्थ येतो?
स्त्रीवेष घेउनि जयें तनु नीच केली,
त्याची सुबुद्धि अवघी विलयास गेली." ९२

घरिसुनि वचना या तुच्छ ऐशा, सुवीर
खवळुनि मनिं गेला चंद्रकेतू कुमार;
शशिवदन ह्मणाला योजुनी वाणि क्रुद्धाः—
"समर करुं, चला, या, सिद्ध व्हा मल्लयुद्धा! ९३
सकळ चमु कशाला पाहिजे? कारणीं या
नरगणसमुहाचा तो नको नाश व्हाया;
निवडुनि प्रति-पक्षीं योग्यसे मल्ल तीन,
लढुनि उलगडा हो टाकुं या कीं करोन!" ९४

### दिंडी.

चंद्रकेतूचा स्फुरे बाहुदंड,
ह्मणेः—"प्रतिपक्षा जिंकिलें उदंड,
तरी मिळणें ना हस्त इंदिरेचा;
अंत एकचि तो पुढें व्हावयाचा! ९५

### श्लोक.

परी हे हिणावोनि जैं दावितातीं,
तरी इष्ट, कीं दावुं या बाहुशक्तीं;
जरी वस्त्र ल्यालों मिषानें स्त्रियांचें,
तरी शौर्य का नष्ट झालें भुजांचें? ९६
असो कांहिं होवो, मिळो ना मिळो ती,
लढूं संगरीं मल्लयुद्धीं सनीती;
बळा दाखवूं, नांव राखूं कुळाचें;
पुढें पाहुं, ती इंदिरा केंविं नाचे". ९७

### दिंडी.

वीरभद्रें तैं युक्ति काढियेली
ह्मणेः—"भगिनीतें लिहुनि येचि कालीं
सांगु तिज, कीं जें ठरे मल्लयुद्धीं,
आचरावें तें पुढें शुद्ध-बुद्धी". ९८

असा झाला संकेत आपसांत;
इंदिरेचा अनुमोदि हें न तात;
ह्मणे मारोनी हात तो कपाळा:—
"बाळबुद्धी ही शोभतेचि बाळां." ९९

करिति उत्तर ना तदा कोणि राया;
पित्याच्या तैं छावणिसि उठे जाया
चंद्रकेतू तो सुमित्र सांगातें,
मल्लयुद्धाचें कथाया पित्यातें. १००

पित्यासन्निध ठाकला दिव्यमूर्त्ति,
मल्लयुद्धाची कथिलि मानसार्ती;
वदे सत्यध्वज:—"ऐक बा सुपुत्रा!
गोष्टि घडल्या रे येथही विचित्रा. १०१

हेर पाठविले तीन लगोपाठ
परत आले, इंदिरा न घे गांठ;
अशा स्त्रीचा उन्माद योग्य—रीती
मोडियेला पाहिजे आह्मिं हातीं. १०२

श्लोक.

गेला एक अधीं महा चतुरसा बा स्वार त्या स्त्रीपुरा,
द्वारासन्मुख ठाकला, परि न त्या देई कुणी उत्तरा;
हांका मारुनि दीर्घ कोरड बहू आली तयाच्या मुखीं;
भेरी वाजवुनी बराचि थकला, कोणी परी नोळखी. १०३

गेला जैं दुसरा, तयासि धमकी देती स्त्रिया धीट त्या;
मुष्टी—मोदक अर्पिले तिसरिया, त्याची मला ये दया;
पाहे सर्व असा प्रकार अपुल्या नेत्रांपुढें इंदिरा;
वार्त्ता ऐकुनि व्यावया परि तयां जाऊं न दे मंदिरा". १०४

पुत्रानें कथिला तदा स्वपितया तैं योजिला मार्ग जो;
ऐकोनी सुतवाक्य, तात खवळे, बोले:—"कुडी ही झिजो!
पुत्रा, प्राप्ति तुला असे न वधुची झाली अरे जोंवरी,
जिंकोनी तुजलागिं ना दिलि, न तों दावीं मुखा भूवरी."
ह्मणाले रायाचे पुरुष दरबारीं:—"नृपवरा!
धरा कां हा हेका फुकट तुह्मि जाण्यासि समरा?
बसा स्वस्थानीं हो, निघुनि रणिं सर्दार सगळे,
स्वदेहांतें अर्पू! कुमारि कशि ती पाहुं न वळे." १०५

साकी.

इतुक्यामाजी नृपतनयेचें पत्रक निजबंधूला
उत्तर आलें, युद्धाचा कीं निश्चय अंतीं झाला;
परिसा, त्या पत्रीं। केवीं लिहि ती नृपपुत्री:—१०६

श्लोक.

"भ्राता! पाहशि तूं, कशी जगतिं या आहे स्त्रियांची स्थिती;
हाणी, आपटि तो पती, कुटि करें, जाळी, जरी स्त्री जिती!
खोडा बेडि पदीं करीं चढवितो, आंधारिंही कोंडितो!
योजोनी कटु दुष्ट रुष्ट वचनें स्त्रीकाळिजा फाडितो. १०७

पद.("बलसागर तुह्मी वीरशिरोमणी"—या चालीवर)

स्त्रीजातीला पुरुष कसे हे अवघे वागविती,
बंधो राया! ठावें तुजला, मुळिं त्यां नच भीती! ॥ध्रु०॥
द्वारींच्या रे श्वानाहुनि त्यां तुच्छ नीच गणती,
बाळपणिंच त्यां श्वशुरगृहाला निष्ठुर धाडीती;
पैशाकरितां वृद्ध अपंगा अर्भक वोपीती,
स्वातंत्र्याला नष्ट करोनी गुलाम बनवीती!

दुर्दैवें पति मरण पावतां छिन्नभिन्न करिती,
इतुकें करुनी तृप्ति होइना! कोंडुनि ठेवीती,
हालीं जाचीं कितीक मरती; अनाथ ज्या जगतीं,
सांगुं कशाला दुःसह त्यांची होई काय गती ॥ १ ॥
स्त्रीजातीला पुरुष ॥ १०८

### श्लोक.

आले हे नटुनी इथें बुडविण्या माझी कृती कृत्रिमें;
ऐसे हो असती नितांत कपटी दुष्कर्मि, मातें गमे;
जी मी हे अति दिव्य वाघ शमवीं, द्वारीं स्वयें पाळुनी,
ती का मी फसणार बाळमतिला ऐशां तिघां देखुनी? १०९

वाघां जिंकियलें, तयां करियलें संपूर्ण आज्ञांकित;
जिंकाया पुरुषां असे कठिण का, अज्ञान जे भासत ?
स्त्रीवस्त्रें परिधान ते करुनियां आले तिघे मंदिरा;
झाला हेतु न पूर्ण; का रिति अशा हे जिंकिते इंदिरा? ११०

### दिंडी.

करी बंधो तूं पारिपत्य त्यांचें,
कार्य साधीं रे पीडिल्या स्त्रियांचें;
कींव कोणा ये ? स्त्रियां कोण त्राता ?
एक देवी कीं वीरभद्र भ्राता ! १११

### श्लोक.

स्त्रियांची शोकार्ह स्थिति बघुनियां मीं उभविलें
अशा ग्रामा येथें, तयिं कि निपजावें फळ भलें;
परी येथें आला सकळ कृति विध्वंस करण्या;
इथे येवोनी तो नृपसुत मला याचि वरण्या ! ११२

दुःखी कामिनिंची स्थिती बघुनियां आली मला रे दया !
केला म्यां पहिलाच यत्न अवघ्या नारी सुधारावया;
आप्तांतें, स्वजनां, कुळा, सकळिकां सोडोनि आरंभिलें
कृत्या या, परि साहलें न पुरुषां, तैं त्यासिं विध्वंसिलें! ११३

पद[1]. राग धनाश्री. ताल एका.

("क्षणभंगुर संसार" या चालीवर).

भ्रात्या ! राखि स्त्रियांची लाज । राखि स्त्रि० ॥ ध्रु० ॥
वैभव स्त्रीचें जाय किं राही, येइल कळुनी आज; ॥१॥ भ्रा०
प्राणाहुति ही देऊं आह्मीं, रक्षाया स्त्रीकाज; ॥ २ ॥ भ्रा०
हाणुनी शत्रू, स्त्री-स्वातंत्र्या रक्षक तूंच विराज; ॥ ३ ॥
भ्रात्या० ॥ ११४ ॥

श्लोक.

मातेचा रुधिरांश तो तुजमधीं; पिंडांशही तो तिचा !
रक्षाया मजला, तुला जननिनें देहो दिला बंधुचा;
माझ्या तूं मनिंचा खरा उमजशी हेतू मुळापासुनी,
रक्षीं रे मजला, प्रिया भगिनि हे गेली असे त्रासुनी !
करीं शिक्षा, बंधो, रणिं नृपसुतातें; विजयि हो !
नको तत्प्राणातें हरण करूं, तूं जाण परि हो !
तया दावीं कीं रे, समरिं लढुनी योग्यहि रिती,
स्त्रियांतें रक्षाया नर कितिक या लोकिं असती. ११६
जयानें मत्प्राणा, जळ-तळिं झणी मारुनि बुडी,
असे रक्षीयेलें, मम निजभुजीं वाहिलि कुडी,
तयाचा मी कैसी हरण करवूं प्राण अबला ?
परी त्याला शिक्षा दिसत करणें भाग मजला. ११७

---

१ हें पद बेहागांत आणि भैरवींतही गातां येतें; ताल त्रिवट.

तूं मारशील, तरि ते मरतील सारे;
हें कृत्य तूं करिं, परी बहु रे विचारें;
मारूं नको, परि तयां करिं योग्य दंड;
हत्येविणें करित शासन ये उदंड. ११८

साऱ्या स्त्रियांचें बळ कोटि-खंडी
येवो तुझ्या रक्षक बाहु-दंडीं!
होई यशस्वी म्हणिं जावुनी रे!
गाईल तूझी जग कीर्त्ति सारें. ११९

जन्मोजन्मीं युवतिमुखिं रे नाम गाजेल तूझें;
कार्य स्त्रीचें बुडत, समुळीं एकटीचें न माझें;
रक्षीं त्यातें निजभुजबळें बंधुराया नरेंद्रा!
डंका वाजे जगिं तव, असे जों गती सूर्यचंद्रा. १२०

बहुत ठेविं चौफेर चौकशी,
पडशि ना तरी बंधु तूं फशीं;
असति शत्रुचे मागते बरें
छपुनि, ऐकतें, छावणींत रे. १२१

गेली एक असे इथूनि अमुची स्त्री शत्रूच्या बाजुला,
टाकोनी निजकन्यका कळतना कोणाकडे कोमला;
रक्षूं अर्भक तें, गुणीहि उपजो, मातेसि तें लाजवो;
स्वातंत्र्योन्नति-पंथ हा निवडिला, अंतासि या पाववो."

ऐशियापरि सती लिहि इंदिरा;
चंद्रकेतुस वदे नृप सद्गिराः—
"फार खोल कटु बोल असे हिचे!
केविं उक्ति अशि ही पुरुषां रुचे? १२३

अहो वीरांची ही गमत जननी जन्मलि असे;
नृपां–शूरांचीया कुशळ अवनीं पूर्णहि दिसे;
जगा वाटे स्वैर प्रखर वडवाग्नी किं अबला,
परी ज्ञाती मोठी, परम विदुषी चित्ति विमला. १२४

स्वेच्छेनें कशि पाहिं ती स्वपितरा राया गजेंद्राप्रति
चातुर्यें निजबुद्धिच्याहि सुबळें, स्वाज्ञेमधीं राखिती?
पुत्रा! आजवरी कसें, बघ तुला नादीं तिणें लाविलें!
आहे दुर्लभ जाणशी, परि मुला! सर्वस्विं वेडाविलें. १२५

जेव्हां स्त्री वळखी असे पुरुष कीं अंगीं मनीं दुर्बळ,
व्रर्चस्वा मिळवावया न कधिंही ती एक सांडी पळ;
जिंकोनी पुरुषाप्रती मिरविते सत्ती तयाचे वरी,
कांहीं होउ विचार, कार्य अपुलें, वाणी करी ती खरी. १२६

दिंडी.

सत्य आहे परि नियम सृष्टिचा हा–
शोभवावें त्या स्त्रियेनें स्वगेहा;
सौख्य नांदे तिथ पतिच्याच पायीं,
विराजे तो नर शूर रणाठायीं. १२७

हातिं त्याणें तरवार गाजवावी,
शिवणकामा सुइ करिं तिणें धरावी;
ज्ञान दावावें, मसलतींत यानें;
हृदयिं कोमलता वाहवी स्त्रियेनें. १२८

गृहा सांभाळुनि, करुनि पक्क अन्न,
पती सेवावा करुनि त्या प्रसन्न;
बाळ खांदे कटिं वाहुनी सतीनें,
तया रक्षावें योग्यशा रितीनें. १२९

नरां-हातीं अधिकार तो असावा,
धर्म आज्ञेचा तिनें आचरावा;
व्यर्थ घोंटाळा नाहिं तरी होई,
जगीं प्रत्यय व्यवहारिं नित्य येई. १३०

श्लोक.

नसावी रे जाया सतत पतिला त्रासवि अशी,
कधीं शब्दें ताडी निजपतिस, पाडी कधिं फशीं;
न जी आनंदाचा मुळिं उगवुं दे अंकुर गृहीं,
गृहा ऐशी भार्या करुनि बुडवावें न कुणिही. १३१

दिंडी.

नसे भ्रांती मज ऐशियेप्रकारीं
इंदिरेच्यासंबंधिं दुःखकारी;
जिंकिं तिजला, ती कधिं तरी वळेल,
अंतिं दीर्घ तुझा यत्न हा फळेल. १३२

श्लोक.

गजा-अश्वालागीं निजकरिं जसा स्वार धरुनी,
स्वसामर्थ्यें घेई सकळ पशुंची शक्ति हरुनी,
तसा जिंकीं पुत्रा नृपकुमरिला युक्ति करुनी;
मुलें होतां जाई सकळ मद तीचा उतरुनी. १३३

अरे लग्न होतां कधीं पालटे तो
स्त्रियांचा स्वभाव, स्वयें शुद्ध होतो;
जयीं बाळकें पोटिं येती, तयांतें
जगीं ज्ञान हें काय हो ज्ञात होतें. १३४

नसे काम सोपें मुलें वाढवीणें;
पुरे रे पुरे होइ तें माय-जीणें;

विचारांत, कृत्यांत, तैसा स्वभावीं
अरे फेर होतो, असें विश्व दावी." १३५
अशा भाषणालागिं सत्यध्वजाच्या
तदा ऐकुनी चंद्रकेतू सुखाच्या,
मनीं आपणाशीं म्हणे शौर्यमूर्ती
'**नको प्राण घेऊं**' असें का ह्मणे ती! १३६
स्मरण मग तयातें जाहलें त्या ध्वनीचें
"**जय तुज मिळतो रे, पंथिं ये दक्षिणेचे;**"
ध्वनिवरि निजचित्तीं ठेवुनी पूर्ण श्रद्धा,
नृपतिदुहितृकामीं चालला मल्लयुद्धा. १३७

**आर्या.**

दोघां मित्रांसंगें युद्धातें चंद्रकेतु तैं आला,
झाला सिद्ध लढाया, माराया कीं स्वयें मरायाला. १३८
स्त्रीवेषा घेउनियां गेले शुद्धीस राजकन्येच्या,
म्हणुनी क्षात्रकुलोचित गेलें बळ काय बाहुंचें त्यांच्या?
युद्धाची सामग्री वीरांच्या स्नायुंमाजि ती वसते;
न नवल कीं त्या त्रिकुटें ठोकियले दीर्घदंड अपुले ते. १४०
बंदुक तरवार तिखट भाला बरची धनुष्य बाणहि ते
या संगरिं तैं त्यजिले, साधाया भुजबळें स्वकार्यातें. १४१
ठेले तीन जसे इथ, तेथें तैसेच तीनही ठेले;
संगर आरंभियला, सैन्य उभय पांक्षि पाहतें झालें. १४२

पद. राग परज. ताल त्रिवट.

("वारिवे मोहाणा बेडा पार"–या चालीवर.)

ठाकले युद्धाला शूर वीर । ते रणधीर ॥
प्रबळ वज्रदेही. ॥ ध्रु० ॥

समरीं स्त्रियांचे वैरी सर्व पडावे
बाहू स्फुरति तैं इंदिरेचेही; ॥ १ ॥ ठाकले०
मनिं वाटलें जावोनी रंगभूमीतें,
जिंकोनि यावें, हर्षवावी मही; ॥२॥ ठाकले० १४३

श्लोक.

भिडे चंद्रकेतूस जैं वीरभद्र,
मुखीं त्यांचिया तैं चढे रंग रुद्र;
भुजीं दंडिं जंघीं पदीं एकमेकां
धराया करीती सुयुक्त्या अनेकां. १४४
परी वीर मोठे ! न कोणी कुणाला
मुळीं आटपे वा, न पावे श्रमाला;
पिळाचे वरी पीळ मारोनि, वीर
वळा स्नायुंच्या दाविती ते अघोर. १४५

साकी.

कमलाक्षाला भुईं पाडिलें आधीं तत्स्पर्ध्यानें;
शशिवदनाची तीच दशाही झाली तिथ युद्धानें;
आतां एकचि तो । नृपसुत समरांगणिं लढतो. १४६

श्लोक.

पाहे युद्ध समीप ती उभि महा-शौर्य-प्रभा इंदिरा;
वाटे राजसुता मनांत "कुमरी ही लाजवीते नरां;
प्रेक्षी शांतपणें कशी सकळिकां, आहे किती धीट ही !
दावूं या हिजला, रणीं कशि नरां ये पालथीतां मही." १४७

दिंडी.

असें बोलुनि, धरि वीरभद्र-दंड,
पीळ मारी मग त्यासि तो प्रचंड;

वीरभद्रें तयिं वळुनि, कुशळ पेंचें
अंग काढियलें झडकरी स्वताचें. १४८
चंद्रकेतू मनिं आपणासि बोले
जयीं लढतां तत्स्नायु ढील झाले:—
" गजेंद्राचा त्या वामनी तनूचा
पुत्र आहे हा काय वीर साचा ? १४९
तरी वाटे मनुजांत मातृ-अंश
अधिक असतो, जयिं वाढतो सुवंश;
नसे पितयाच्या वामनी तनूची,
परी मातृबळा साक्ष असे ह्याची !" १५०

साक्या.

उजव्या डाव्या पिळपेंचांतें मारुनि उभय नरांनीं,
परस्परांतें जर्जर केलें, लढतां आली ग्लानी;
झाले विव्हळ ते, । स्वमनीं ह्मणती का घडतें. १५१
इतुक्यामाजी चंद्रकेतुला वीरभद्र पिळ मारी;
फेंकुनि देई धरातळवटीं, बाहू-अस्थि विदारी;
पडला वीर रणीं, । घातें थरथरली धरणी. १५२
हर्ष जाहला स्त्रीमंडळिं तैं, गर्जे जयजयकार,
धरणीवरती नृपसुत पडला मेळविलें यश थोर;
ह्मणती-"जिंकियलें, । पुरुषां शासन अजि झालें." १५३
सत्यध्वज निजपुत्र पाहुनी धरणीवरि पडलेला,
कंपित होवुनि समरांगणिं तो धांवुनियां गेला;
वदनीं "हाय" ह्मणे !। "आतां जगतीं काय जिणें ! १५४

पुत्र रणामधिं पडला, वैभव आतां सारें गेलें,
चंद्रकेतु कुळदीपक गेला, कृष्ण वदन मम झालें !
आतां कैंचि स्नुषा ? । प्रभु हे झाली काय दशा ! १५५
काय करूं अजि राज्यपदाला, धिग् धिग् मम जिविताला,
बाळा ! पुत्रा ! कशालागिं हा संगर दुर्धर केला !
आतां कोण वरी । बहु इच्छित ही तव नवरी ?" १५६

श्लोक.

राजा न्ह्याळी भूवरी पुत्र–आंग,
बोलेः—"मूर्च्छा ही, किं हा मृत्युसंग !"
राहीलेंना भान राया जगाचें;
गेलें वाटे श्रेय साऱ्या श्रमांचें. १५७

पांचवा सर्ग समाप्त.

---

## सख्य नामक सर्ग साहवा.

श्लोक.

न्ह्याळोनि सत्यध्वज पुत्रकाया
मूर्च्छावलेली रणभूमिठायां,
वांकोनि चांपी, परि भान नाहीं;
चांपीत जैसा नयनान्ध राही! १
पितयाचिये ना मुळिं जीव जीवीं
सुत नासिकाग्रीं निजहस्त ठेवी;
कमळापरी जो सविकास होता,
पडला असे तो गलितांग आतां! २
ह्मणेः–पुत्रा ऐशी कधिं कुणि अरे काय करिती
वधूची संप्राप्ती? सुगम न गमे ही मज रिती;
वधूच्या प्राप्तीला प्रखर तुज संग्राम घडला;
सुवर्णाच्या अद्री–सम तव तयें देह पडला! ३
पडावें या तूझ्या विकळ तनुपाशीं मनिं असे;
स्वहत्या जाणें मी दुरित, वद तें आचरुं कसें?
न भीं मी मृत्यूतें, परि बहु असें भीत दुरिता;
बहू गेलें आयू, करिं मज अतां देव धरिता. ४
कमलजा मग ये सरसावुनी
नृपतिच्या बहु कंपित मागुनी,
स्वतनुजा निज मंजुळि अर्भक
परत मेळवुं ये तिथ याचक. ५

---

१ इंदिरावृत्त श्लोक ७ वा.

दिंडी,

युग्म

कशी रीती ये कमलजा इथे ती?
स्मरा तरि ती जिथ पडलि रडत होती;
जयीं नृपसुत तेथोनि संगराला
शशी–कमलाक्षासह निघोनि गेला; ६
तयीं आक्रोशें कमलजा पुन्हा ती
पडे धरणीवरि, अश्रुलोट येती;
पुन्हा मूर्च्छा ये, करीत आक्रोश;
माय–ममतेचे कठिण महा–पाश! ७

कांहिं वेळानें उठे, सभोंतिं पाहे,
संगराचा तों कानिं नाद वाहे;
संगरांगणिं ये, तोंचि पाहियेलें
चंद्रकेतूला धरणिं पाडिलेलें. ८

श्लोक.

मंदिरामधुनियां सकळा परी
इंदिरा बघुनि हर्षलि अंतरीं;
लग्नवाद अजि ना मुळिं राहिले,
पारिपत्य कुंवराप्रति जाहलें. ९

दिंडी.

कडे घेउनियां, कमलजा–सुतेला
स्थानिं राहे उभि उच्च चारुशीला;
काढियेला ध्वनि जो किं गगनपंथीं
भेदि अंबर, वसुमति, कर्णग्रंथी. १०

पद. ("गडे हो कृष्ण गडी"—या चालीवर).

रिपूचा नाश भला झाला, । स्वयें तो देहिं निमाला. ।।ध्रु०।।
पेरियलें स्त्री–मुक्ति–बिजाला, अंकुर त्या आला; ।।

रिपु तन्नाशा अवतरला, घाली निष्ठुर वरि घाला, ॥
अंतीं देहिं निमाला; ॥ रिपूचा नाश भला झाला. ॥ १ ॥
मुक्ति-वृक्ष हा स्त्रिया उभारिती, जाती जमवीती, ॥
इतुक्यामाजी नर येती, वृक्षा छेदुं पहाती,
परि रिपु देहिं निमाला, ॥ रिपूचा नाश० ॥ २ ॥ ११

श्लोक.

'स्त्रीरूपी हा तरु उपटुनी पाहिजे तेथ नेवूं,
भेदोनी त्या' पुरुष वदले 'आपुल्या कामिं लावूं,
जाळूं त्याचे करुनि तुकडे सर्पणालागिं कांहीं,
नौका होड्या सुरुचिर घरें बांधवूं कैक त्यांहीं.' १२

परी यत्न गेले फुका ते तयांचे,
मुळीं कांहिं आलें न हातीं नरांचे;
करायास येतांचि स्त्रीवृक्षघात,
नरें मोडुनी घेतलासे स्वहस्त. १३

असे मोडलें शस्त्रही हातिं त्यांच्या,
वसे अंगिं शक्ती अशी त्या स्त्रियांच्या;
अहो वृक्ष वाढेल हा थोर आतां;
चढूं योग्यते उन्नतीकाळ येतां. १४
सुरंगें सुशोभा जशी ये वसंतीं,
स्थिती स्त्रीजगीं तेविं होईल अंतीं;
दया देविची थोर, शत्रू निमाले,
हरायास आले स्वयें हारिं गेले. १५

जे युद्धीं श्रमले स्त्रियां सुखविण्या भ्राते महा-शूर ते,
ज्यांहीं संगरिं या मृता नगरिला केलें पुन्हा हो जितें,
या गुंफूं फुलहार रम्य सतिंनो घालूं तयांच्या गळीं;
या होऊं पुजुनी तयां मनभरें, वीरांघ्रिंच्या हो धुळी. १६

झालीसे अवघी चिरायु अपुली आतां कृती ही खरी;
युद्धीं गौरविलें तिला, उपरि या ती कोण हो संहरी !
या आतां उचला, सुबंधु मम हे घायाळ जे जाहले;
नेवूं मंदिरिं, या, तिथे निजवुं त्यां, जे संगरीं भागले. १७
ज्यांहीं रक्षण आपुल्या नगरिचें केलें तयां गौरवूं,
दावूं पूर्ण कृतज्ञता निजकरीं, त्यां लौकिका पोंचवूं ;
न्हावूं या, धुवुं, चोळुं, खाववुं, तयां, स्त्र्यर्थींचि जे शीणले;
स्त्रीकैवारपवित्रित त्रिजगतीं जातील हे गाइले." १८

## साकी.

बोलुनि ऐसें सती इंदिरा मंदिर सोडुनि आली,
घेउनि निजकरिं मंजुळि बाळा चाले ती गजचाली;
पाठीं येति स्त्रिया । पडल्यां अनेक उचलाया. १९
कोणी उघड्या, कोणी शाली पांघरलेल्या आल्या,
अनवाणी कुणि, जोडे लेवुनि अस्ताव्यस्त निघाल्या;
"वीरां उचलाया"। आपसां ह्मणती "हो! या! या." २०
चालति नारी कुरणांतुनि, तैं नाजुक तत्पद रम्य
कुरण चारिवरि दिसती सुंदर, कृति ईशाचि अगम्य,
वीरां उचलाया । निघती धांवत त्या बाया. २१

## आर्या.

उपमा {
हरिणींच्या कळपामधिं,यूथपति हरिण जसा उभा राहे,
शिरिंची सुशृंग-शोभा गगना दावित,दिगंतरा पाहे; २२
तैशी ही मृगनयना मृगसमुदायांत इंदिरा दिव्या
शोभे प्रमुख विशाळा,येतां साह्या स्वबंधुच्या सेव्या. २३
}
कटिवरि मंजुळिबाळा घेवुनि बंधूसमीप उभि राहे;
प्रेक्षी बंधुमुखाला, घर्माचा लोट ज्या शिरीं वाहे. २४

जिंकियलें वीराला भगिनीच्या शत्रुला रणीं युद्धीं;
झाला विगलित बहु तो, निजदेहाची नसे तया शुद्धी. २५
तुंबळ युद्ध महा हें झालें दारुण, बहू असें विरळा;
हरला सत्यध्वजसुत, परि दावियलें तयें स्वबाहुबळा. २६
शशिवदनें कमलाक्षें निजसामोऱ्यां स्वबाहुदंडांचें
दावियलें सामर्थ्य, प्राबल्यहि तें तसेंचि स्नायूंचें. २७
जरि पडले थकुनी ते, चिरले, चुरले, मनींहि चुरचुरले,
परि सामोऱ्यां जर्जर केलें कीं देहभान त्यां नुरलें. २८

दिंडी.

तिघां ऐशां बंधूंस पाहुनी ती,
हस्त कुरवाळी तयांचे स्वहस्तीं;
वदलिः—"यांतें या मंदिरांत नेवूं;
धुवूं, चोळूं, घायांस तेल लावूं ! २९

श्लोक.

हे भ्राते अति दिव्य वीर सकळां मुक्तिप्रदाते खियां,
द्यावे येथ पडूं कसे ? निजपुरीं त्यांतें चला नेवुं या !
ऐसें बोलुनि जाय ती तिथ, जिथे तो चंद्रकेतू पडे;
बुद्ध्या ती तिथ जाय कीं, कळत ना हें दैवयोगें घडे. ३०

सत्यध्वज प्रेक्षुनि इंदिरेला
पुत्राचिये सन्निध मौन ठेला;
मुद्रा तयाची दिसली उदास,
कीं केसरी प्रेक्षि मृतार्भकास. ३१

पाहोनी गलितां विदारित भुजां तैं चंद्रकेतूचिया,
रक्तें माखियल्या मुखा, सुहृदयीं आली सतीच्या दया;
सुस्कारा तयिं टाकुनी सकरुणा रायाप्रती न्याहळी;
प्रेक्षूनी नृपतीस त्या गहिंवरें, ती होइ काळीनिळी. ३२

नृपतिची अशी पाहुनी स्थिती,
शरम पावली इंदिरा सती,
वदलि:—"रक्षिलें मज्जिवा जयें,
अनुजहस्तिं का मृत्यु त्यास ये!" ३३

साक्या.

इतुकें वदली, याउपरी तो नृप निजसुतकंठींची
नृपतनयेची प्रतिमा काढी रक्षिलि बहु दिवसांची,
दावी नृपतनये, । तैं स्मृति तिज मातेची ये. ३४
स्मरण जाहलें बाळपणाचें, आला हृदयिं उमाळा;
पाहुनि नृपसुत—पांडुर—वदना गहिंवरली नृप—बाळा;
वाटे तिजलागीं । "दिसते निजकृति विकलांगी." ३५

श्लोक.

पश्चात्ताप तिच्या हृदीं उपजला, "हें काय आरंभिलें!
केलें काय, मनीं किती अवतिलें, अंतीं कसें जाहलें.?
उद्गारां अशि काढुनी नृपसुताच्या ये बसे ती कुशीं,
वीजेची विधुकोर चक्षु हरिते, चक्षू हरी ती तशी. ३६
ठेवी अंगुलि राजपुत्रभ्रुकुटीं, न्याहाळि तन्नासिका;
बोले—"प्राण असे अहो तनुमधीं, राया, भिऊं हो नका!
भावांसंगतिं चंद्रकेतुस नृपा! हो! नेवुं द्या मंदिरा!
भाऊ मानुनि पूर्ण या अवसरीं सेवील त्या इंदिरा!" ३७
आहे प्राण सुताचिये तनुमधीं हें ऐकुनी राजिया,
आला जीव जिवीं, पुन्हा सकळ तच्चिंताहि गेली लया;
झालीं स्तब्ध, तटस्थ तीं उभयतां रोंखूनि न्याहाळिती;
दोघें शोभति, जेविं वासर—निशा सम्मेलनीं शोभती. ३८

उष:समयिं जेविं ती दिनकरा निशा शोभवी,
तशीच तिनसांजची जशि रविप्रभा लोपवी,
स्वयें दिसुनि सुंदरा, तशि दिसे सती इंदिरा;
न कांहिं वदली मुखें अखिल खुंटली तद्गिरा. ३९

दिंडी.

इंदिरा ती मग स्तब्ध कांहि वेळ
उभी राहे; कटिवरुनि उतरि बाळ
कमलजेचें, तें ठेवि भूमि-ठायीं,
पडुनि लोळे इंदिरेचिये पायीं. ४०

साकी.

इतुक्यामाजी कमलजा ती निजबाळेच्या पाशीं
हळुहळु येउनि सस्मित कन्ये धरण्या जाइ उराशीं;
धरणीं पडलेली । नभिंहुनि चांदणि जणुं आली. ४१
माते पाहुनि हातपाय ती प्रेमें नाचवि बाळा;
काढियला ध्वनि प्रेमळ बाळें; परिसुनि येइ उमाळा;
माता कळवळली; । घ्याया निजबाळी वळली. ४२
पाहुनि कृति ही सती इंदिरा हस्त तिचा झिडकारी,
बोले:—"बाळी तुझी नव्हे ती, माझिच दिव्य कुमारी.
देईं मजला ती । नेदीं मी ही तुज हातीं." ४३
बाळक राहे उगें ऐकुनी, ध्वनि हा; कंपित झालें;
आ पसरूनी, माय ह्मणे मनिं, कां संकट हें आलें!
लागे हाय जिवा, । कैसा विरह हा साहवा! ४४

श्लोक.

आली ग्लानि मुखासि, घर्म अवघ्या अंगाप्रती तो सुटे;
देखोनी निज अर्भका जननिला पान्हा दुधाचा फुटे;

"देई गे" वदली सती "मम सुता, दे इंदिरे मंजुळा!"
ऐकोनी परि इंदिरा द्रवत ना वाणी अशी कोमळा. ४५

पद. ("सुधन्व्या मोह कसा"—या चालीवर.)

"अतिचतुरे तूं थोर उदारे, कैशी ना ह्मणशी ॥ ध्रु० ॥ नूतन कलिका माझी बाळी ॥ न मिळे मजला पडुनि कपाळीं ॥ प्रसवल्यें अशि कोण्या काळीं? ॥ आपुली ह्मणवीशी; ॥ १ अतिचतुरे० ॥

पाडस माझें दशमासाचें ॥ बळकावीशी द्रव्य कुणाचें? ॥ निर्दय होउनि माय–मुलीमधिं ॥ अंतर पाडीशी; ॥ २ ॥ अतिचतुरे तूं ॥

त्यागुनि आल्यें, बहु मी चुकल्यें ॥ ह्मणुनि काय मम रत्ना मुकल्यें?॥ दुग्ध उरीचें नाहीं सुकलें, ॥ तान्हलि दे मजशीं, ॥ ३ ॥ आति चतुरे०

असेल बाळा झालि भुकेली; ॥ कैशी माझी बुद्धी गेली! ॥ व्यर्थ अर्भका शिक्षा झाली, ॥ पडलें हाय फशीं! ॥ ४ ॥ अतिचतुरे तूं०" ॥ ४६

श्लोक.

ऐकुनी तिचें वचन प्रेमळ
इंदिरा स्वयें परम कोमळ,
पाहि रोखुनी कमलजेकडे
न्ह्याळि मंजुळे धरणिं जी पडे. ४७
स्तब्ध जाहली, न वच बोलली,
चंद्रकेतुच्या जवळि ठाकली,
एकवार त्या बघितलें तिणें,
वेंचि जो तिच्याप्रति असें जिणें. ४८

**साकी.**

इतुक्यामाजी शरीर ज्याचें होतें व्याकुळ झालें,
शशिवदनें त्या इंदिरेच्चिया पायां कंवटाळीलें;
जाई रांगुनियां, । विनयें तिजला विनवाया. ४९

**श्लोक.**

पाहुनी तया गहिंवरे सती,
घाय लागले बघुनि त्यांप्रती;
रूप ओळखी, जवळि येत ती,
गीतगानिं जैं बिघडली कृती. ५०

**दिंडी.**

तिला आठवला तदा तो प्रसंग,
जयीं गेला बिघडोनि सर्व रंग;
मुखा अवलोकित उभी नार राहे,
शब्द वदला शशिवदन तैं तिला हे:– ५१

पद. राग पिलू; ताल त्रिवट.

("खचित बाई व्यर्थ आह्मी अबला"—या चालीवर).

"हृदय बाई निष्ठुर कां करिशी? । निष्ठुर कां करिशी?
हृदय बाई० ॥ ध्रु० ॥
प्रबळ प्रतापी सुंदर वनिता । विशाळ जी दिसशी, ।
इंदिरे विशाळ जी दिसशी, ॥ १ ॥ हृदय बाई० ॥
माता-ममता बलवत्तर हें । केवीं नाठविशी ? ।
निपुण जरि, केवीं नाठविशी ? ॥ २ ॥ हृदय बाई० ॥
समरीं आह्मां जिंकुनि अजि तूं विजयी ! गे होशी, ।
खचित गे विजयी तूं होशी; ॥ ३ ॥ हृदय बाई० ॥
त्वदंघ्रिं गेलों दडपुनि आतां । व्हावें काय तुशीं, ।
अजुनि तरि व्हावें काय तुशीं ? ॥ ४ ॥ हृदय बाई०. ५२

पद. राग असावरी, ताल त्रिवट.

("बाळा जाईं परतोनी"—या चालीवर.)

[ सं० शाकुंतल,-अंक ४ ]

द्यावें बाळक जननीला, दयाळे! ध्रु० ॥
कैशी होशिल धन्य ठेवुनी अन्याची बाला?॥ १ ॥ द्यावें०
अंता आलें नाटक अमुचें, मित्र रणीं पडला! ॥२॥ द्यावें०
आतां पुनरपि चालिव अपुल्या स्त्रीवैभवलीलेला; ॥ ३ ॥
द्यावें०. ५३

श्लोक.

ऐकें भाकित आजि मी करितसें जाणूनि साऱ्या जगा,
या ग्रामीं जमती स्त्रिया, तव करीं होवो तयांची निगा,
स्त्रीप्रेमा तुझिया कृतीवरि जडो; वाटे मनीं पूर्ण या
अंतीं एक दिनीं तुला न कळतां जाईल सारें लया. ५४
अर्ध्या गे जगतास तुच्छ करिशी, तें काय ना सूड घे?
काळेंही कलहासि मूळ कधिंना कांहीं इथें ना निघे?
झाला आपसिं एकदां कलह या स्त्री-मंडळा-भीतरीं,
होई सर्व जगीं पुरें हंसवणें, ही सत्य गे वैखरी. ५५
गेला मित्र रणीं पडोनि हरला, झाला मृतप्राय तो!
भूठायीं पडला, न हें कळत कीं मेला असे वा जितो!
स्त्रीप्राप्त्यर्थ उपाय या-उपरि ना होणार त्याचा सती!
त्वद्भ्रातें हरिलें अह्मांसि, तरली तेणेंचि तूझी कृती. ५६
जी तूं लग्न करावयासि नसशी राजी, तया तूजला,
बाळें गे खुटलीं कशा? करिशि का तूं घेउनी त्यांजला?
इच्छीशी मुलिं व्हाविना तुज मुलें, कां घेशि अन्याचिया?
कोठें तूं शिकलीस गे, पढविलें कोणीं तुला या नया? ५७

नाहीं तुझें जें, वळकाविशी कां ?
कां त्रास देशी उगि दीन लोकां ?
कां नाडशी गांजशि गांजल्यांतें ?
कां मेलियां मारिशि दुष्ट घातें? ५८
जरी आजी आहे हृदयिं तुझिया नांदत दया,
जरी अंश स्त्रीचा तव तनुमधीं गे, तरिच या–
घडीं देई बाळे नलिन–कलिके तूं कमलजे;
कशा ठेवीशी तें, जननिप्रति जें बाळक सजे ? ५९
तुझी माता जातां, तुजशिं निजपुत्रीसम जिणें
असे रक्षीयेलें, तिज नचि असें योग्य करणें;
तरी देई कन्या तिजशिं तिचि आतां गुणवते !
तुला लज्जा वाटे, तरि मजशिं दे; देइन तितें." ६०
असे ऐकुनी शब्द धिक्कारयुक्त,
चढे राजपुत्री-मुखीं नेत्रिं रक्त;
परी कोप तीचा क्षणांतीं निमाला,
उदेतांचि कीं सूर्य अस्तासि गेला. ६१
मुखा पाहुनी मंजुळेच्या सती ती
द्रवे चित्तिं, त्या वत्सले घेइ हातीं;
ह्मणे:–"बाळ माझें जरी बोलवीलें,
तरी आजि त्या त्यागणें भाग आलें! ६२
जाशी तूं जननी-करीं, शुभ असो गे राजसे तूजला !
जाशी या नगरासि टाकुनि, जरी लावोनी माया मला,
होवो माय तुला तुझी सुखकरी, तूझ्या पडो धार्जिणीं,
जी माझी नचि जाहली, फसवि जी संपूर्ण सत्कारणीं! ६३
देवी राखु तुला सदा, सकळिकां जी सौख्य दे मानवां;
बाधा होवु तुला न त्या नरकरीं, जे नाडती स्त्रीभवा;

जा वत्से जिवड्ये प्रिये चिमकुल्ये जा होइं दीर्घायु गे !
चित्तीं ठेविन मी सुरूप तव गे, जों प्राण माझा जगे. ६

शशिवदनि वेल्हाळे बाळे, कशी तुज अंतरें!
नलिनकलिके जातां, वाटे कसें मज गे बरें!
'गुरुभगिनि'या नामें प्रेमें सदा तुज पाळिलें;
पडशि अशि कां माते-हातीं? फुका तुज रक्षिलें!" ६५

साकी.

गहिंवरुनी मुख मंजुळिचें मग नृपतनया कुरवाळी;
"जा" वदली "सुखि होईं वत्से!"—"घ्या, देतें ही बाळी
"देवी रक्षावें, । हिजवरी कृपा-कवच घालावें"! ६६

श्लोक.

असें बोलोनी ती शशिकरिं तदा देइ कुमरी,
तयें ठेवीली ती करिं शशिकलेच्या तदुपरी;
धरी माता हातीं, शशिवदन-वीरा प्रणत ती;
मिळाली कन्या जी, परम ममता न्याहळि सती. ६

बहु कळवळली ती, अश्रु सानंद आले;
वळवळ पुरि झाली; इष्ट तें प्राप्त झालें;
हरणुलि हरिणीला सांडलेली मिळाली,
कवळुनि उरिं घाली, तान्हली चुंबियेली. ६८
चुंबुनी स्मित अशा अधरा मुखा,
पावली कमलजा अतुळा सुखा;
खेळवूनि कुमरी अशिये रितीं,
इंदिरेप्रति वदे मग नम्र तीः—६९

"होतों मैत्रिणि गे; अतां परतुनी जातें स्वधामाप्रत;
नाहीं या वदना पुन्हा तुजप्रती मी दाविण्या इच्छित;

नाहीं योग्य तुझ्या कृतीस अशि मी त्वन्मंदिरीं कीं वसें;
माझ्या स्थानीं दुजीस योजुनि, करीं भावे तुला गे तसें.७०
जातें गे; गत-गोष्टिला विसरुनी, मातें क्षमा तूं करीं;
बोलें गोड सुशब्द एक, तुजला आहें ग मातेपरी;
वर्षें कैक मियांचि रक्षुनि तुला ज्ञानामृता पाजिलें,
आधीं या अति उत्तमा पथिं तुझ्या वृत्तीस म्यां योजिलें."७१

इंदिरा तिला "हूं" न बोलली,
मंजुळेकडे दृष्टि लाविली;
वीरभद्र तैं क्रुद्ध जाहला,
सिंहनादिं तो शूर बोलला:—७२

"कठिण-हृदया होशी कैशी स्वजातिशिं इंदिरे!
बहुत पुरुषां देशी दोषां स्वजातिसमुद्धरे!
करुनि, भगिनी, ऐशी शोभा नको कुळ लाजवूं;
विनविं; निववीं क्षोभा साऱ्या; नको मज गांजवूं! ७३
येवो, गे! करुणा तुला परिसुनी सप्रेम बंधूवचें;
शोभे जाड्य न हें तुझ्या सुहृदया, साजे वराहत्वचे;
घे हातीं कर गे हिचा, भगिनि! या सप्रेम चुंबीं मुखा,
बाल्यापासुनि वाढवोनि तुजला जैं पाववीलें सुखा. ७४

नयनिं बघ तिच्या हे अश्रु येती अपार;
सलत हृदय माझें पाहुनी दुःख थोर;
भगिनि! विनवि तूझा बंधु, योद्धा तुला गे!
बघवत मज नाहीं हें मुळीं कोमलांगे!" ७५

परि न इंदिरा शब्द बोलली,
क्षिति न्यहाळिती स्तब्ध राहिली;
बहु पित्यास ये कोप तैं तिच्या,
वदतसे तिला क्रुद्ध या वचा:—७६

"आहे म्यां मज वाटतें, परिसलें, रक्तीं असे लोह तें;
त्याची पूर्ण प्रतीति आजि मजला माझी सुता दाविते;
नाहीं शब्द चकार एकहि मुखीं! काठिण्य हें कोठचें
येई गे हृदयांत पुत्रि तुझिया? कैसें तुला हें रुचे? ७७
पिंडापासुनी या तुला न जडली ही वृत्ति गे दारुण;
नाहीं गे! तुज आइच्या तनुंतुनी हा लाधला दुर्गुण;
होती सज्जन ती दयामय पुरी, संतांमधीं आगळी;
कां ना भूतदया वसे तव मनीं, जैशी असे त्वत्कुळीं? ७८
परी जाणें नित्य प्रकृति तुझि तीव्रा दिसलि ती;
असावी कोणाची वरचस तरी तूजवरती,
ह्मणोनी योजीली गुरु तुजप्रती योग्यसमयीं;
असें यावें त्याचें श्रमद फळ का आजि उदयीं? ७९
जननि अंतरतां तुजला दिलें
शशिकलेप्रति; तीजशिं योजलें
निवडुनी तिज शिक्षक योग्यशी;
बिघडशी तिजपायिं मुली अशी! ८०

दिंडी.

शशिकले त्या मग सुधारावयाला
योजिली म्यां ती कमलजा सुशीला;
कमलजा तैं तुज गुरु दुजी जहाली.
तिच्या साह्यिंच ही नगरि उदयिं आली. ८१

श्लोक.

पुत्रि? तूं वदशि एक न शब्द का?
बोललों तुजशि का इतुकें फुका?
कारणीं बघ तुझ्या पडले किति
वीर धीर नर मूर्छित हे क्षिति. ८२

श्लोक.

अशासाठीं का गे, तुज नगरि आरंभिं दिधली ?
सुखाचीं पूर्वीं ग्यां जिथ घडि-पळें घालवियलीं;
जिथे आनंदानें रमुनि, रमवोनी निजजनां
सदा संतोषीलें; करिशि तिथ का निष्ठुर मना ? ८३

दिंडी.

बोल तिजशीं तूं बोल, सांगतों गे !
खेळलीशी बाळपणिं जिच्या संगें;
जिवा-कंठाची प्रिया काळिजाची
कशी अव्हेरिशि ! हृदय कां न जाची ?

सजे हें कां तुज, कीं तुझ्या कुळाला ?
किती माजविशी आपल्या खुळाला ?
काय वैभव शोभेल कृतीनें या ?
प्रसवली गे, तुज व्यर्थ माझि जाया ? ८५

श्लोक.

धिक्कार पाषाण-मना तुझ्या गे !
अद्यापि उन्माद शिरांत जागे ?
ये शब्द ना एक मुखीं तुझ्या तो,
माझा किती हा अपमान होतो!" ८६

परि न शब्द मुखांतुनि इंदिरा
मुळिंच काढि, न देतहि उत्तरा;
बहुत लाज तिला मनिं वाटली;
वदलि ना परि अंतरिं दाटली. ८७

### साकी.

सत्यध्वज तिज बोले:–"साध्वी जाणुनि कोमळ तूतें,
रुकार दिधला, न्यावें पुत्रा उपचारा तुजहातें.
वाटे परि चुकतों, । देतां त्वत्करिं सुत, मुकतों. ८८

### दिंडी.

जरि न अपुल्या तूं जातिच्या जिवाला
बघुनि कळवळशी दुःखि मैत्रिणीला,
काय अन्यांला ठाव गृहीं देशी?
शिरीं वैऱ्याचा भार काय घेशी ? ८९

बघुनि विपरीता सर्व त्वत्कृतीला,
भीति वाटे बहु माझिया जिवाला;
औषधाच्या तूं करुनियां मिषाला,
पोटिं पुत्राच्या घालिशिल विषाला. ९०

नको नेऊं त्या तुझ्या मंदिरातें;
धुविन, चोळिन मम सुता मीच हातें;
करिन उपचारां यथाशक्ति पुत्रा,
शिथिलता मम जरि असे आलि गात्रां." ९१

### श्लोक.

परिसुनि अशि वाणी राय सत्यध्वजाची,
गहिंवरलि मनीं ती इंदिरा पूर्ण साची;
द्रवुनि हृदय गेलें ऐशिया वाक्शरांनीं;
उपजलि मनिं लज्जा; गांजली ती निदानीं. ९२

वदलि कमलजेला:–" ये अगे सत्वरी तूं,
कवळुनि उरिं मातें गे ! धरीं; प्राणतंतू

तुटुनि अझुनि गेला नाहिं, तों भेटुं ये गा !
विगलित मम या गे ! लाव ये अंग अंगा. ९३

बहुत मजसि वाटे लाज माझ्या कृतीची;
विसरुनि गत गोष्टी, शांतता मन्मनाची
प्रियकरि करिं गे तूं, मागतें त्वत्क्षमा मी,
यदुपरि वसुं तूझ्या संगतीं जीर्ण धामीं. ९४

साकी.

अपराध तुझा नाहीं; झाला प्रारंभीं माझाची;
स्त्रियां येउं कां दिलें जयांशीं सलगी होति नरांची ?
झाली दोघांना । शिक्षा; अंतरलें माना ! ९५
होतों जैशा मैत्रिणि, तैशा झालों;-ये मम माते !-
झालें गेलें त्याची वार्त्ता पुनरपि मनिं नाणीं तें;
देवी ! साक्षी तूं । रक्षीं निजमनिंचा हेतू !" ९६

श्लोक.

सत्यध्वजातें अनुलक्षुनी ती,
बोले, "महाराज ! असे विनंती;
द्या पुत्र, नेतें निजमंदिरातें,
धुवीन, चोळीन तया स्वहस्तें. ९७

श्लोक. ( मणिबंधवृत्त. )

ध्रुपद.
नाशियलें तैं मत्कृतिला, । देह परी हा रक्षियला;
स्त्रीजन स्वातंत्र्या मुकला; । चंद्र* परी योद्धा ठरला; ९८
व्याकुळ घायांनीं पडला, । रक्षिन त्याच्या मी तनुला;
प्राण न गेला तो लढतां, । देवि-कृपा ही थोर अतां! ९९

---

* चंद्र=चंद्रकेतु.

## श्लोक.

राया हो अपुल्या महाबळि सुतें मत्प्राण संरक्षिला–
झाला हा उपकार, तैं बुडवुनी टाकीयलें हो मला;
बोलूं या-उपरी नका मजप्रती कीं ही कृतघ्ना असे;
याची अंतरिं साक्ष पूर्ण वसते, दुष्टा किती ही दिसे. १००

या, हो, या! नगरा तुझी अमुचिया; या इष्टमित्रांसवें;
नारी जातिल सर्व त्या निजगृहीं; त्यांहीं कशा राहवें?
मत्कृत्या तडि न्यावया अजि मुळीं हो! संधि ना योग्य ही;
नित्याचा क्रम तोचि इष्ट दिसतो–स्त्रीनें खपावें गृहीं. १०१

प्रार्थीं सादर मी तुम्हांसि नृपती! ऐका वचा माझिया!
ताता! बांधव! मी तुम्ही अळवुं या मायाळु रायांसि या,
कीं येवोनि दया तयां निजसुता देतील ते न्यावया;
घाला भीक मला, झणी मजसवें आतां निघा जावया." १०२

नेत्रीं तिच्या अश्रु भरोनि आले,
सत्यध्वजें उत्तर नाहिं केलें;
राहे उभा स्तब्ध अधोमुखें तो,
चित्तीं परी हर्षित थोर होतो. १०३

तदा शशि[1] विनम्र तो कमलजेस बोलेः–"सती!
तुझा अनुज सुंदरे! रणिं पडे धरे; त्याप्रती
अगे सकळिकांसवें इथुनि न्यावया मंदिरा
दयार्द्र नृपकन्यके! विनविं तूं स्वयें इंदिरा. १०४

तयाप्रतिहि लागले बहुत घाय या संगरीं;
तयांसि उपचार गे कवण तूजवीणें करी?"

---

१ शशिवदन.

तदा वदलि इंदिराः—"कमलजे! तुझा बंधुही
चला नगरिं नेउं या, तुज न ठेविं चिंता ग ही. १०५

वीर संगरीं लढुनि भागले,
घाय ज्यांचिया तनुंस लागले,
त्यांसि मंदिरीं इथुनि न्यावया
पातल्यें, चला सकळ नेउं या !" १०६

परिसुनी अशिया वचनाप्रती,
शशिकला करुनी मुख वक्र ती,
वदलिः—" का करिशी अजि इंदिरे !
स्वकृतिचें तुज भान कसें नुरे ? १०७

पद. जिल्हा झिंजोटी. ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं—या चालीवर.")

करुनि तूं नियम कैशी निज वचना मोडिशी ?
बहु वर्षं पढविलें जें, क्षणिं कैसें विसरशी ?
पुरुषांना ओळखीत्यें, ह्मणुनी हा तूजशी
पथ म्यां गे दावियेला, परि अंतीं फशिं पडशी!" १०८

श्लोक.

धिक्कारवाणी परिसोनि ऐशी
तैं इंदिरा, उत्तर दे न तीशीं;
गर्जोनि बोले परि सिंहनादें,
तैं अंतरिक्षीं घन-शब्द कोंदेः—१०९

"जो जो मूर्च्छित येथ युद्धिं पडला, वा शत्रु वा मित्र हो,
न्या सर्वां निजमंदिरा स्थिर मनें; मानूं नका भीति हो !
देई दोष मला जरी शशिकला, त्यागी मला ये घडी,
चिंता काय?-उठा, चला, सकळिकां न्या मंदिरा तांतडी. ११०

साकी.

टाकुनि जाई जरी शशिकला, एकटि वाहिन भार;
सुवेळिं नेइन कार्य तडीला, नुरला जरि आधार;
परि हो नच आजी। घडि या यश ये स्त्रीकाजीं." १११

श्लोक.

संतप्त झाली बहु राजबाळी,
आला झणी ताम्र सुरंग भाळीं;
बंधू पिता शांतविती तियेला;
सत्यध्वजें यत्न तदर्थ केला. ११२
उचलुनि पडलेले सर्व घायाळ नेले;
जतन करुनि, साऱ्यां मंदिरीं रक्षियेलें;
मिसळति नरनारी, भेद ना अंतरंगीं;
नगरि गजबजोनी गेलि ऐशा प्रसंगीं. ११३

दिंडी.

राजपुत्रा विस्तीर्ण खोलिमाजी
ठेवुनीयां, इंदिरा तया पाजी
दिव्य औषधि, जो भागला सुयुद्धीं,
रणीं पडल्याची ज्यास नसे शुद्धी. ११४
सर्व घायाळां औषधोपचार
योग्य रीतीनें जाहला उदार;
तयें श्रमलेल्यां सौख्य फार झालें,
इंदिरेला सत्कार्यश्रेय आलें. ११५

साकी.

कितिक युवतिंचे सैन्यामाजी भ्राते आले होते;
एकमेक तीं वळखुनि अपणां, चालति सुखि सांगातें;
सौख्या पार नसे; । भगिनी-प्रेम असेंचि असे ! ११६

पद. जिल्हा झिंजोटी. ताल त्रिवट.

( "चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर. )

किति भगिनी बंधुसंगें वनिं क्रीडे चालल्या;
वहु दिवशीं भेट झाली, कडकडुनी भेटल्या;
किति नारी आपुलाल्या गृहमार्गा लागल्या;
अंति अशा कांचनींच्या[१] चौं वाटा जाहल्या ! ११७

सख्यनामक सर्ग सहावा समाप्त.

---

१ कांचनपुरीच्या=कांचननगरीच्या.

# संलग्न नामक सर्ग सातवा.



पद. राग मालकंस[1], अथवा हमीर[2], ताल त्रिवट.

नगरीचा विध्वंस । झाला, नगरीचा विध्वंस ! ॥ ध्रु० ॥
भगिनि-कृतीच्या नाशालागीं । शिरले जणुं नर-कंस;
झाला नगरीचा० ! ॥ १ ॥
अपेश आलें कांचनपुरिला, । पडे तिचा अवतंस; ।
झाला नगरीचा० ! ॥ २ ॥
मनिं नर ह्मणती योग्य अंत हा, । होतें कार्य नृशंस !
झाला० ॥ ३ ॥—१

दिंडी.

रूप पालटलें सर्व मंदिराचें;
होइ पालन तिथ योग्य त्या नरांचें;
नारि सेविति सप्रेम आवडीनें;
सौख्य घायाळां होतसे तयानें. २

पूर्व उन्मादा अंत पूर्ण आला;
पुरुषनारींचा संधि दिव्य झाला;
जेथ पुरुषांचें नांव नाशियेलें,
तयां—लागीं उपचार तेथ झाले. ३

---

१ मालकंस रागः— "लाविली थंड उटी वाळ्याची.—" या चालीवर;
[ सं० शाकुंतल—अंक ३, किर्लोसकरकृत. ]

२ हमीर रागः— "मज हें तापद गृह झालें.—" या चालीवर;
[ सं० मृच्छकटिक—अंक १, अण्णा मार्तंडकृत. ]

श्लोक.

घायाळांच्या पाशिं बैसोनि कोणी
गीतें गाती, पाजिती पेजपाणी;
शब्दें, बोलें, नम्रता सर्व नारी
दावोनीयां तोषवीती विहारीं. ४

दिंडी.

चित्तिं झाली परि इंदिरा उदास;
कार्य गेलें समुळीं तिचें लयास;
बहुत लज्जित मनिं झालि फार खंती;
कृती आरंभिलि, घालविलें अंतीं! ५

श्लोक.

आली ग्लानी; ना कुणासंगतीं ती
कांहीं बोले, ना करी काम हातीं;
बैसे जेथें, ऊर्ध्व दृष्टी करोनी,
तासांचे ती तास काढी बसोनी. ६

दिंडी.

कधीं जाई उद्यानिं ती फिराया
उषःकाळीं, वा तीनसांजठायां;
तिचें अंतर परि रमेना विहारीं;
वदेः—"पडल्यें मी, हाय, केविं हारीं ! ७

अंजनी गीत ( राग माढ—ताल एका ).

झाली मत्कार्याची माती,
गेलें सारें पुरुषां-हातीं;
होती जैसी पूर्वी स्थिति, ती
झाली नारींची ! ८

जेथें विद्यालय स्थापीलें,
घायाळा तें स्थान जहालें;
आतां वैभव सारें गेलें,
बुडलों आह्मि नारी! ९
होवो होइल तैं उत्कर्ष;
स्त्रीवृंदाचा परामर्श
घेतां, झाला पुरुषस्पर्श;
बुडलों आह्मि नारी! १०

पद. जिल्हा काफी, ताल त्रिवट.

("जन हो तारक श्रीजगदीश्वर जाणुनी"—या चालीवर.)

अवघें स्त्रीजन-तारक कृत्य कसें हें । निमिषांत गेलें
लया! ॥ ध्रु० ॥
नरगण मिळुनी, स्त्रीराज्य छळुनी, विध्वंसियलें तया! ॥१॥
अवघें स्त्रीजन-तारक०
आयुष्यभर हा स्त्रीजन-देहो, दासत्विं वेंची वया; ॥ २ ॥
अवघें स्त्रीजन तारक०
काबाड वाही संसारडोहीं, परि ये न पुरुषा दया; ॥ ३ ॥
अवघें स्त्रीजन-तारक०
उन्नती-मार्गाप्रत या स्त्रीवर्गा, आशा नुरे न्यावया ॥ ४ ॥
अवघें स्त्रीजन-तारक० ११

पद. जिल्हा झिंजोटी.[1]

("अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली"—या चालीवर.)

काय महा मम हातुनि ऐसें पातक तें घडलें.
इच्छा मनिंची पूर्ण न झाली, सुकृत अंतरलें! ॥ ध्रु० ॥

---

१ या पदाला चौथ्या सर्गांतील "कां अश्रु हे नयनीं येती!" या पदाची चाल लावतां येते. तशीच, या काव्यांतल्या पांचव्या सर्गांतल्या "स्त्रीजातीला पुरुष कसे हे," पदाचीही चाल लावावी. या दोन्ही चाली खेदपर आहेत.

बीज पेरिलें म्यां, फळ-वेळा जवळी ती येतां,
कीड लागली तेणें त्याचें पुष्पचि ना फुललें;
लागुनि जातां लतेस वाटे रम्य कळे कंवळे,
झंझामारुत सुटोनि सगळे तैसेची गळले ! ॥ १ ॥
काय महा मम हातुनि ऐसें० १२

ज्ञानपान जिथ व्हावें, तेथें घायाळ आले,
विध्वंसुनि या नगरीलागीं थोर वीर पडले !
झाला सारा घोंटाळा हा, कार्य लया गेलें;
ऐशी फसलें समूळ, आतां कांहिं नसे उरलें ! ॥ २ ॥
काय महा मम हातुनि ऐसें० १३

पद. ( "बहुत छळियेलें नाथा"—या गर्म्याच्या चालीवर. )

एक मीं अंवतिलें, । दैवें अन्य घडविलें. ॥ ध्रु० ॥
स्थापियलें मुक्तीमार्गा म्यां, । बिघडीलें दैवें
कार्या अबलासौख्या सुगतीला; ॥
रे ! कैसें निष्ठुर दैवा, वैभव स्त्रीचें नाशियलें! ॥ १ ॥
एक मीं अंवतिलें० १४

पद. ( "अरसिक किति हा शेला"—या चालीवर. )

विपरित समय हा आला ! । या मंदिरीं पुरुषप्रवेश
जहाला ! ॥ ध्रु० ॥
ऐशा कर्मगतीला । काय ह्मणावें स्त्रीहीनतेला ?
जो पथ मीं काढीयेला, । ज्याचीये वृद्ध्यर्थ बहुयत्न केला,
निजग्राम ज्यासाठीं त्यजिला, । दुर्लौकिक जगीं जयिं
मिळवीला,

पुरुषां जो ना रुचला, । हर हर ! कैसा तो अंतीं बुडला !
॥ १ ॥ विपरित समय हा आला ! " १५

श्लोक.

ऐसा हा घडला प्रकार अवघा त्या मंदिरा-भीतरीं;
गेला काळ बहू, मुळीं न उठला तो चंद्रकेतू परी;
रात्रंदीस पडे निचेष्ट; अमिता नारी उभ्या भोंवत्या;
बाहू-अस्थि-विदारणें नृपसुता झाले बहू क्लेश त्या. १६

साक्या.

कमलाक्षाला भगिनि कमलजा पाजी औषधपाणी,
मधुकरि येउन तिजसांगातें बोले मधुरा वाणी;
मंजुळ वचनांनीं । तोषवि, प्रेमळशा गानीं. १७
जिला पाहुनी सुख नेत्रांतें होइ सदा मनुजांच्या,
विशेष सुखवी सन्निध येतां समयीं ती दुःखाच्या;
साक्षात् संजिवनी । तत्पर वीरांच्या अवनीं. १८

दिंडी.

तयासन्निध बैसोनि मधुकरी ती,
रमवि कमलाक्षा बहुत गोड रीतीं;
कथा सांगे त्या पुराणांतरींच्या,
तयें रूपा ती दावि स्वांतराच्या. १९

श्लोक.

असे नवल काय तें, बसुनि एकटीं दोन तीं
घडोघडि परस्पर स्वमन काय तें जाणती ?
समक्ष कमलाक्ष तो पडुनि क्लेश-शय्येवरी
स्वरूप वळखी तिचें, तिज अपेक्षि जो स्वांतरीं. २०

## श्लोक.

मधुकरी-कर ये-परि रक्षितो
परम कोमलसा कमलाक्ष तो;
विकृतिमुक्त झणीं जयिं जाहला,
त्यजिलि शेज, सुखें फिरूं लागला. २१

## साक्या.

ज्यां काळीं त्या शैलपायथ्यापाशीं अधिं घोटाळा
होउनि, नारी तिरडुनि गेल्या अवघ्या त्या वेल्हाळा,
शशिकला वदली । वाणी, मिथ्या ती ठरली. २२
भाकित केलें तिणें असें तैं–"येइल घडुनी साचें
लग्न तये निशिं शशिकलेशीं मार्गीं शशिवदनाचें;"
मिथ्या तें ठरलें । भाकित, घडुनी ना आलें. २३
माय कमलजा हिजला मिळवुनि दिधली मंजुळी बाला,
परि शशिवदना तिनें न वरिलें, वश झाली ना त्याला;
मिथ्या वचन ठरलें, । भाकित घडुनी नचि आलें. २४
कमलजेचा शशिवदनाला लागुनि गेला ध्यास,
कमलजेला उमजुनि आलें, परि ना लाभलि त्यास;
अंतरिं आवडला, । परि तो नाहीं स्वीकरिला. २५
तिला वाटलें, स्वीकरितां त्या, पुनरपि लग्नविधीचा
प्रसंग येउनि, कोप निश्चयें खवळे नृप–तनयेचा;
ह्मणुनी शशिवदना । कमलजा झाली ती वश ना. २६
एके दिवशीं बसलि सती जैं सन्निध शशिवदनाच्या,
औषधपाणी पाजुनि सांगे गोष्टी रम्य परीच्या,
बोले तो तिजला । "साध्वी, वरिं गे तूं मजला." २७

### दिंडी.

इंदिरेनें हे शब्द आयकीले;
आड होती, कुणिं तिज न पाहियेलें;
कमलजेचें मुख इंदिरा न्यहाळी,
शब्द वदली ना, स्तब्ध परत गेली. २८
कमलजेनें हा पाहिला प्रकार;
ह्मणे अंतरिं कीं—"चुके एक घोर;
हिची वृत्ती वळली दिसे विवाहीं,
नसे लग्ना उरला निषेध कांहीं." २९

### श्लोक.

राग कालिंगडा, ताल त्रिवट. (धिमा.)

इंदिरेप्रती मग पुन्हा अतां
चंद्रकेतुचा विनवितो पिता,
वीरभद्र तो, अनुजही दुजे,
तातही तसा, वदत आत्मजे:— ३०
"कन्यके अगे, समज तूं धरीं,
योग्य संधि ही, नवरि हो तरी;
योग्य वीर जो पुत्र सद्गुणी,
योग्य तो तसा होइ गे धणी. ३१

### साकी.

ऐशा सुंदर पुरुषाचा तूं कां करिशी अव्हेर?
ना ह्मणशी गे उगा कासया, त्यागिशि कां संसार?
चित्तीं मनन करीं, । अझुनिहि नृपपुत्रास वरीं." ३२
ऐसें ह्मणतां निशिदिनिं तिजला, तिचिया चित्तिं विचार
लग्नाचा हळुहळू शिरुनि मनिं झाला तत्संचार;
अंतर पालटलें, । लग्नालागीं वश झालें. ३३

पद. जिल्हा झिंझोटी–ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

उद्भवलें इंदिरेच्या प्रेम तदा अंतरीं;
बैसूनी चंद्रकेतू–सन्निध ती सुंदरी
कुरवाळी हस्त त्याचे, गोंवी त्यां निजकरीं,
गाउनियां प्रेम गीतें राजसुता मोहरी. ३४

साकी.

नृपतनयाला परोपरी जरि नृपजेनें रमवीलें,
चैन पडेना जिवा तयाच्या, क्लेशें त्या ग्रासीलें.
कासाविस होई, । जणुं का प्राण घडिंत जाई. ३५

पद. राग धनाश्री, ताल एका.

("विश्वेश्वर प्रभु पतितोद्धरणा"—या चालीवर.)

भग्न–अस्थि–वेदना भोगिल्या असतिल दुर्दैवें ज्यानें,
त्यासचि उमजुनि येईल त्या किति भोगीलें नृप-
तनयानें. ध्रु०
तत्सन्निध नृपतनया बैसे कुरवाळित निजहस्तानें;
भिरकावुन दे हस्त तियेचा, क्षणिं अपुल्या तो हृद-
या ने; १ भग्न–अ०
भान तयाला नुरलें कांहीं, विगलित झाला अंगानें,
नयन असुनि तो अंध जहाला, ध्वनि ऐकेना कर्णानें; २
भग्न–अस्थि–वेदना० ३६

---

१ या पदास "हरिणाक्षी ती प्रिया माझी"–सं० शाकुंतल, अंक, ६, ही चाल, अथवा "लाल शालजोडी जरतारी"–सं० सौभद्र अंक, ४, ही चाल शोभते.

## श्लोक.

विरोधक.

घडिमधिं तिजला तो "इंदिरे!" हांक मारी,
"सुखकर! तरुणी गे!" ऐशिये तो प्रकारीं
वदुनि मुखिं, जणूं कीं प्रेम दावी मनाचें
परि उमजुनि ये कीं भान त्या नाहिं साचें; ३७

ह्मणे तिजशिं, "मत्प्रिये! हृदयरंजने राजसे!"
धरी स्वकरिं तत्करा, परि न भान त्यातें असे;
करीं धरुनि अंगुली नृपकुमारिची प्रेक्षितो,
जशीं रमति बालकें, रमत तेथ तो, लोळतो; ३८

ह्मणे कधिंकधीं तिला, "कठिण गे तुझें इंदिरे
असे हृदय तें किती!। द्रवुनि अद्रिही पाझरे,
परी न तव मानसीं किमपिही दया उद्भवे;
कितीहि तुज आळवीं, परि न चित्त तूझें द्रवे. ३९

पद. रागिणी बागेसरी, धिमा तिताल.

("प्रीति लागो तुझीये दृढतर पायीं"—या चालीवर.)

काय ऐसा शुभांगे! धरिशी ग हेका? ध्रु०
नको नको ह्मणशी। कशा, फुका त्यागिशी गृहींचें
सौख्य तूं; १ काय ऐसा शुभांगे." ४०

## श्लोक.

वाटे राजसुते, स्थितीस बघुनी त्या चंद्रकेतूचिया,
कीं बुद्धिभ्रम होउनी सुकुळिंचा पावेल भानू लया;
चिंतेमाजि अशा सती बसतसे शय्येचिया सन्निध,
रात्रीं ती अपरात्रिंही श्रम करी सप्रेम नानाविध. ४१

अग्नी–सन्निध ठेवितां वितळुनी जाई जसें तें घृत,
राखाया बसतां तशी सतत ती सत्यध्वजाचा सुत,
अंतीं ये द्रव तीजला, कळवळे पाषाणरूपी मन,
पाहोनी नृपजाचिया बहुविधा क्लेशास रात्रंदिन. ४२

श्लोक.

राग माड, ताल त्रिवट.

युग्म.
सत्यध्वजाचें मुख पाहुनीयां,
चिंतातुराची उपजोनि माया,
भ्रात्यां-पित्याची उमजोनि वृत्ती,
केला तिणें अल्प विचार चित्तीं:–४३
"हे सांगती सर्व सभोंवतालीं
तें सत्य भासे, शुभ सर्वकालीं;
'पांचीं मुखीं ईश्वर नित्य नांदे'–
ज्ञानी सदा उक्तिस कान या दे." ४४

बोले मनीं:–"हे जुगतात जोडे,
क्रीडोनि संगें नरनारि कोडें;
मोदूनियां प्राणि परस्परांतें,
संपादिती इष्ट जगीं सुखातें." ४५

साकी.

विवेक ऐसा करुनि इंदिरा गहिंवरली प्रेमानें,
ह्मणे–"त्यजावें काय तयाला रक्षियलें जळिं ज्यानें?
श्रमला मजसाठीं, । सांवरिलें मज निज पाठीं! ४६

सोडुनि ग्रामा मजलागीं जो धुंडित वरण्या आला,
लढला मत्प्राप्त्यर्थ वीर-नर, जर्जर रणिं तो झाला,
त्यातें अव्हेरूं? । कोठें सौख्या मग पावूं! ४७

पद. जिल्हा मांझ, ताल त्रिवट.

( "छाये मधुबनमें"—या चालीवर. )

त्यातें ह्मणवीन मी आपुला; प्रसंगीं जेणें रक्षीलें, । त्यातें
ह्मणवीन मी० ॥ ध्रु० ॥

सरिता-लहरी-माजि पडोनियां । होतें बुडत जयीं, । तेणें
मज काढीलें, ॥ त्यातें ह्मणवीन मी० ॥ १ ॥

कैशि आजवरी । माझिये अंतरीं । सारी स्मृति भासली, ।
कृतघ्न जहालें ? ॥ त्यातें ह्मणवीन मी० " ॥ २ ॥ ४८.

श्लोक.

इंदिरे मनीं ऐशिये परी
खेद उद्भवे; निश्चया करी—
"राजपुत्र कीं योग्य तो वर,
देइं मी तया आपुला कर." ४९
ज्या कोठडीमाजि पडे बिछाना,
भिंतीवरी तेथ विचित्र नाना
होतीं सुरंगी बहु रम्य चित्रें
पोथ्यापुराणांतिल नारि-पात्रें. ५०.

दिंडी.

एक त्यांमधिं भिल्लीण पार्वतीचें
चित्र होतें शितिकंठ शंकराचें,
सत्व पतिचें ती हरावया आली
रूप पालटुनी तैं हिमाद्रि-बाली. ५१

श्लोक.[1]

प्रमिलार्जुनांचें तिथ चित्र दूजें,
पडद्यावरी रेखित दिव्य साजे;
प्रमिला जिनें अर्जुन जिंकियेला,
वसवोनि राज्यास प्रताप केला. ५२

साकी.

त्या चित्रांतें सती इंदिरा प्रेमानें न्याहाळी,
बहु गहिंवरुनी नयनांतुनि ती ढळढळ अश्रू गाळी;
नृपसुत-हस्तातें । घेउनि, कुरवाळी त्यातें. ५३
गहिंवरला तो राजपुत्रही पाहुनि नृपतनयेला,
न्याहाळुनि तन्मुखा घडीभर, विव्हळ मनिं बहु झाला;
मानवं हृदयाचा । ऐसा चमत्कार साचा. ५४

युग्म
जेविं पारिजातक उमलुनियां सुंदर सायंकाळीं,
चंद्रमुखाला अवलोकी तें बसुनी आपुल्या ढाळीं,
अंगीं सुकुमार । शोभा दावी तें थोर. ५५
तैसा नृपसुत निजशय्येवरि उमलत जणुं का पुष्प,
नृपतनया-मुखचंद्र न्याहळी तेजोमय बहु रूप;
बोले नृपतनये । प्रेक्षुनि नृपसुत अति विनयें:—५६

पद. जिल्हा झिंजोटी, ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

"सन्निध का असशि साक्षात् हे मत्प्राणेश्वरी!
स्वप्नीं कीं मी ग! आहें, मज न कळे सुंदरी!
होतिस जी पूर्वकाळीं; तशि असल्या अंतरे
संसारीं सौख्य मातें, प्राण–हरे, मी नुरें! ५७

---

१ इंदिरा वृत्त—श्लोक ८ वा.

## साकी.

कोमळ परि तूं भाससि मजला पालटलें तव रूप,
वरिलें ना, परि धरलें करिं मज रक्षियला तनुदीप;
स्वप्नावस्था ही । केलिस कैशी ? ती पाहीं ! ५८
स्वप्नावस्था पूर्ण करीं ही, तत्सुख मज भोगूं दे!
जीवन–आशा नुरली, आतां त्वत्करिं मरूं दे मोदें !
आला प्राण गळीं, । देईं चुंबन या वेळीं!" ५९

## दिंडी.

वदत ऐसें सद्गदित कुंवर झाला,
कंठ दाटुनि गहिंवरें पूर्ण गेला,
भान नुरलें, काळोखि नयनिं आली;
स्मृती नाहीं, गति पुढें काय झाली. ६०
एक राहीलें तयाचिये ध्यानीं,
वचन आटपतां इंदिरा उठोनी,
वांकुनीयां तन्मुखातें न्यहाळी,
चुंबि प्रेमभरें सती तया भाळीं ! ६१

पद. राग हमीर–ताल त्रिवट.

("कृष्ण गडी आपुला । यमुनाडोहिं बुडाला"—या चालीवर.)

दोघांचा झाला । अजि संधि, असा झाला ॥ध्रु०॥
गेला मनिंचा दुभाव सगळा, । गर्व तिचा गळला;
द्वेष नरांचा ऱ्हासुनि गेला, । प्रेमा उद्भवला;
नृपतनयाला मित्र मानुनी, । हृदयीं तो धरिला;
स्त्रीकोमलता-प्रकाश पडला, । नृपसुत वांचविला; १
ऐसा संधि आजि झाला. ६२

**साकी.**

या-उपरी त्या नृपतनयाला गाढ सुनिद्रा लागे,
बैसुनि तत्सन्निध प्रेमें ती अहोरात्र तिथ जागे;
दोघां सुख झालें, । अंतीं योग्य घडुनि आलें. ६३
एक रात्रिं जैं सुखनिद्रेंतुनि जागृत नृपसुत झाला,
नेत्र उघडुनी पाहे तंव तो देखे तिथ नृपबाला;
बसली सन्निध ती, । होती पद्मावळि हातीं. ६४
कोमळ शब्दें आपणासि ती पद्मावळिंतुनि गीतें
गात होति, तीं परिसुनि झालें सुख बहु नृपतनयातें;
ऐका काय सती । गीतें मंजु स्वनिं गातीः- ६५

पंजाबी ठुंबरी राग केसुरी, ताल त्रिवट.

("गा हो जगपति"—या चालीवर.)

"निद्रासुख घे अवघी अवनी;
तरुवल्लरि स्थिर अपुल्या स्थानीं. ध्रु०
संतत चंचळ जलधितरंगीं
मीनहि झांकिति नयन सुरंगी; १ निद्रासुख०
अशा प्रसंगीं खद्योतचि तो
तेजोरूपी जागृत राहतो; २ निद्रासुख०
तद्वत् माझ्या रूप प्रियेचें
चमकत शोभे रम्य प्रतीचें; ३ निद्रासुख०" ६६

पद जिल्हा राग झिंझोटी-ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

"नभिं शोभे अस्तमानीं जें तारामंडळ!
तशि उदितां चांदणी तुं! अंतरिं गा! प्रेमळ;

जशि पडतां गगनिं उल्का निजमार्गा दाखवी,
सखे तैसें मनन तूझें मच्चित्ता दीपवी"! ६७

साक्या.

"सायंसमयीं मावळताहे नलिनीकमळ तडागीं,
खद्योतांचे थवे जमुनियां चमकति जागोजागीं,
ऐशा तूं काळीं। राहें जागृत वेल्हाळी! ६८
निद्रासुख हें घ्याया प्राणी निजगृहिं सारे जाती,
परि गे राहें जागृत प्रियकरी! तूं माझी सुखदाती!
मजला रमवाया, । बैसें सन्निध ये ठायां"! ६९

श्लोक.

"दिनकर बघ, अस्तालागिं तो दिव्य जाई,
सुचिर कमळ डोहीं, पाहिं तें, धांव घेई;
मम हृदयसरोजीं तेविं येई प्रिये गे।
कमळमुखि शुभांगे, कोमळे, कोमळांगे! ७०
नगशिरावरुनी सरिता जशी
उतरते, सखि तूं उतरें तशी
करित नृत्य कड्यां-गडग्यांवरी!
तुझिच वाट बघीं इथ सुंदरी"! ७१

साकी.

"पर्वतशिखरावरि राहुनि तूं काय करिशि सुखशाली?
ये गुंफेच्या ठायिं विहारा वासंतिक-सुख-कालीं!
अद्री सोडुनियां, । येई धरणीच्या ठायां! ७२

हिम नगशिखरावरी नांद्तें, शिथिल करी हृदयाला;
अन्य रीति परि धरणीवरती जागृत करि प्रेमाला;
प्रेमा नगशिखरीं । नांदत न कधिंच अंतरीं. ७३
अद्रीशिखरावरुनी येई विद्युत् चपला पायीं;
ऐकुनि तूझें वर्णन भुलली, आलों मी या ठायीं;
येई! तुजसंगें । क्षणभरि चित्त तरी रंगे. ७४
परस्परें तीं संगें रमल्या हृदयें जडुनी जाती,
अंतीं प्रेमां उद्भवुनीयां एकचित्त जन होती;
घडतां संधि असा, । येई बळ त्या प्रेमरसा. ७५
यास्तव येई, नांदें सन्निध; नांदूं दे तव संगें!
सुखविन तुजला, आळवीन मी भुलविन नानारंगें;
अंतीं जिंकिन मी, वरुनी नेइन निजधामीं"! ७६

श्लोक.

"सहस्र जेथें सरिता वहाती,
धरेसि मंजु स्वनिं गाजवीती,
असे ध्वनी ये सखि ऐकण्याला
नगाचिया सोडुनि माथियाला. ७७

पंजाबी ठुंबरी. राग केसुरी, ताल त्रिवट.

"शतशा लहरी नाचति जेथें,
तुषारमय पय फेंकिति पंथें; ॥ ध्रु० ॥
मंजुळ कोकिळ–रव जिथ नांदे,
ऐशा स्थळीं ये; सन्निध रमुं दे; ॥१॥ शतशा०" ७८

### श्लोक.

युग्म.
असें गाइलें गीत त्या इंदिरेनें;
बहू होइ संतोष मंजु स्वरानें;
तदा राजपुत्र स्वनेत्राप्रती तो
हळू ऊघडोनी, तिला न्याहळीतो; ७९

तयिं सुमुख तिचें त्या वाटलें म्लानसें तें;
बहु गहिंवरली, ना हाललीं नेत्रपातें;
धरणिसि अति लज्जा पावुनी, न्याहळी ती,
मनन करि असें कीं 'वागलें कोण रीतीं.' ८०

पद. जिल्हा झिंजोटी, ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

घडिमाजी सुचिंतेनें मृदुकाया कोमली!
गलितांगी लाजरीच्या वल्लीसम जाहली!
मुख तिचें बघुनि ऐसें, अंतरिं जी गांजली,
विव्हळला चंद्रकेतु; मनिं करुणा दाटली. ८१

### साक्या.

पांडुरता तिजवदनीं आली, कंपित झाले हस्त;
चमके नेत्रीं सौजन्य तिचें, जरि ती चिंताग्रस्त.
बोले अपणाशीं—। "चुकल्यें, चुकल्यें, हाय कशी! ८२

गेला गेला लीनपणा मम अंगींचा तो सारा!
लीनपणाविण मत्कार्याचा होता केविं पसारा?
आरंभीं ऐशी। चुकल्यें, चुकल्यें, हाय कशी! ८३

सुवर्णखाण खणाया गेल्यें विकळ अशा शस्त्रांनीं!
जलधिपयातें शोषायाला गेलें कीं चिंध्यांनीं!
आरंभीं ऐशी। चुकल्यें, चुकल्यें हाय कशी! ८४

पद. रागिणी भैरवी, ताल त्रिवट.

(" संतपदाची जोड"—या चालीवर.)

आतां मी कर्माला। लावूं दोष कशाला? ध्रु०
घडुनी आलें हातिंच माझ्या, । त्यागियलें
विनयाला! १ आतां मी कर्माला० ८५

पद. राग परज, ताल त्रिवट.

("तो नर गति चुकला"—या चालीवर.)

परि मी काय करूं? काय करूं? । तुजला कैशि वरूं?
विचार केला खोटा, । अंतीं फसलें झाला तोटा! १
परि मी काय करूं० ?
दिसशी शूर वीर मोठा, । जाणें तव मनिंची उत्कंठा;
२ परि मी काय करूं? ८६

श्लोक.

कशी रे या अर्पूं सकळ मम देहास तुजला?
कशी जीवा देवूं नर-करिं, अरे सांग मजला?
असे जाती ज्यांची प्रतिकुळ सदा स्त्रीजनसुखीं,
घडे मैत्री त्यांशीं कवणपरि सांगें निजमुखीं? ८७

पद. जिल्हा झिंझोटी, ताल त्रिवट.

("चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर.)

पुरुष किती दुष्ट रीतीं वागविती स्त्रीजना!
नियमानें एकपक्षी; निर्दय तद्भावना;

धृतिशौर्यादिधर्म सारे समरीं ते दाविती,
सोबतिणिला भव-वनींच्या परि बहु ते जाचिती. ८८

पद. रागिणी भैरवी, ताल दीपचंदी.

शकुंतलेशीं काश्यप सांगे
'ऐशिये रीतीं सासरीं वागें:–
'पतिकोपीं नम्र असावें,
सवतीशीं प्रेम धरावें.' *

परि ना सांगे, कां सवत असावी,
पतिकोपवृष्टी कां तीच व्हावी!
कां न पतीनें विवेक करावा,
कां न स्त्री-देखत कोप निवावा!
कोमळ शीतळ सुखदा सदा जी,
देखोनी कां जीव व्हावा न राजी?
एक-पत्नी-व्रत कां नाचरावें?
सोडूनि कां एक दुजिला धरावें?
पुरुषां कुणि हा अधिकार दिधला,
कीं तो जगाचा धनि एक बनला?
दोन स्त्रियांशीं सम-प्रीतिनें तें
आचरण कैसें सम कधिं होतें?
आवड-नावड दुःखद शिरती,
गृहिं सुखकंद तेणेंचि नुरती;
पुरुषांची अशि दुःसह करणी,
वरण्याहुनी त्यां, पडावें मरणीं! ८९

---

* किर्लोसकरकृत संगीत शाकुंतल, पृष्ठ ७२, प्रथमावृत्ती.

पद. त्याच चालीवर.

संसारिं स्त्री-सौख्य टाकुनि देती,
साधु असें कुणी ह्मणवूनि घेती!
साधुत्व काय स्त्रीसंगें मिळेना?
गृहिं काय मन तें प्रभुशीं वळेना?
भस्म शरीरा लावूनि बसती,
गिरिगव्हरीं कुणि दिनरात वसती,
जाणति ना परि, गृहिं त्या स्त्रीयेचें
विरहानळें भस्म होई साचें!
परि काय बोलेल बापडी जाया?
सर्वस्विं आधीन जी पतिराया!
पतिराय ऐसें नाम अशांला
शोभे कधिं? तें द्यावें कशाला? ९०

श्लोक.

न माझ्या हातें हें सकळ युवतीकार्य घडलें
जया आरंभीलें, उपजत जरी तेंचि पडलें,
नको जाणूं कीं जें युवति ह्मणती सर्व खुळ तें;
स्त्रियांची पाहोनी स्थिति मम बहू चित्त सलतें." ९१
ऐशा सुंदर इंदिरा वदलि तैं वाक्यां खऱ्या स्पष्टशा;
वर्णीली, घडली असे बहुपरी स्त्री-लोकिं जी दुर्दशा;
ज्ञानार्त्ती धरिली खरी कुमरिनें, शाळाहि संस्थापिली,
उन्मादा वरिलें परी, स्वकृति तैं नाशा तिणें वाहिली. ९२
नरां न वरणें असा करि किमर्थ खोटा पण?
पहा वरुनि दुर्मदा, निजमनाप्रती आपण
गुलाम करुनी ह्मणे मनिं "**स्वतंत्र आहे स्वयें;**"
स्वतंत्र अशिये रितीं कधिं स्त्रियांस होतां न ये. ९३

मानोनी नर पूर्ण दुष्ट अवघे तत्संगती सोडिली;
'**संहारा पुरुषांचिया उपजली**'-संज्ञा अशी जोडिली;
बुद्धीनें दुसऱ्यांचिया फसलि ती; झाली पराधीन ती;
घोटाळ्यामधिं तैं स्वयें पडलि ती, ह्मणूनियां ह्युन्नती! ९४

**दिंडी.**

परी आहे ती मानवीच प्राणी,
कितीही ती मनिं दुर्विचार आणी;
प्रेम हृदयीं तें मानवांविषींचें
राहि जागृत, जें मूळ सत्सुखाचें. ९५

**साकी.**

अनुभव याचा पूर्ण पहा, तो कैसा घडुनी आला:—
केला द्वेष जरी पुरुषांचा, तरि वळली नृपबाला,
दावी तत्परता । नृपसुत-अवनीं राजसुता. ९६
जात्या कोमळ अंतर होतें निःसंशय बाळीचें,
परि चुकली ती शिकुनी लक्षण नाशक तें अन्यांचें;
अंतीं वळली ती, । काळें पालटली कुमती. ९७
समजहि नव्हता त्या बाळेला, केवळ तरुण वयें ती;
वाढत बुद्धीवर्द्धन झालें, विचार उठले चित्तीं!
ठावें तिज झालें, । **भोळ्या भावें फसवीलें.** ९८
अहोरात्र तिथ बैसुनि सेवित सन्निध नृपतनयाला,
सृष्टि—चमत्कृति तिणें पाहिली, जाणीलें जगताला;
बोले "अजि कळलें, । भोळ्या भावें मीं फसलें. ९९
करुनि घेतलें हास्य जगामधिं, कधिं ऐसें ना झालें;
मूर्ख माझिया सम ना स्त्री कुणि, सृष्टी जोंवरि चाले;
धुंडल्या पृथिवीला, । न मिळे कधिंही जोड मला. १००

पिपीलिका ती शोषिल सागर, होइल रविची रक्षा,
अन्नपाणि जन टाकुनि घेतिल वडवाग्नी निजभक्षा,
परि हो दुजि अबला । नुपजे कधिंही जोड मला!"१०१

श्लोक.

ऐसें जैं वदली तटस्थ भरले डोळे तिचे अश्रुंनीं;
मुद्रा म्लान दिसे पडे निसटुनी पद्मावली हातुनी;
गेली रात्र, तमासि सूर्य लपवी तेजोमयीं रश्मिनीं,
जाई ती भरुनी पुरी वसुमती पक्षी-सुमंजुस्वनीं. १०२

उठुनि जावया इंदिरा निघे,
झणिं तिच्या करा चंद्रकेतु घे;
स्वकर फीरवी तन्मुखीं, वदेः–
"कृति तुझी अगा! थोर, तापदे! १०३
नको आपणा तूं सती दोष देवूं;
नरातें हि तेंवीं नको शब्द लावूं;
नसे कांहिं अन्याय गे त्या नराचा,
नसे तो नियंता, न कर्त्ता जगाचा. १०४
जगाच्या क्रमाला बहू काळ झाला,
जसा आधिं होता तसा होत गेला;
स्वयें सृष्टि जैशा क्रमें नित्य चाले,
तया न्यायमार्गेंचि हें सर्व झालें. १०५
जरी भार्या तूं या–उपरी मम होशील सुखदा,
महा-निष्ठेनें त्वत्कृतिस अवघ्या रक्षिन सदा;
अगे संतोषें मी सकळ-युवत्युत्कर्ष-अवनीं—
प्रतिज्ञेनें सांगें–'श्रम करिन संगें निशि–दिनीं.' १०६
असे कार्य जें! इंदिरे त्या नरांचें,
नसे काय तें कार्य त्याही स्त्रियांचें?

जसा पावतो तो पदा नीच–उच्चा,
तसा पालटी तो पदांतें स्त्रियेच्या. १०७

श्लोक. मणीवंधवृत्त.

बोलशि कां तूंः–'**मी न वरीं**'?
होइ ग! तूं **माझी नवरी**!
ठेविन निष्ठा तूजवरी,
घेइन तूझें कार्य करीं. १०८

स्त्रीजनकार्या साधिन मी;
आगमिं स्त्री, तैशी निगमीं;
सौख्य गृहीं त्या देति स्त्रिया,
नाहिं जगीं गा! जोड तयां! १०९

श्लोक.

नरांच्या गे नारी जगतिं असती मैत्रिणि सती!
नरां-नारीं-लागीं अखिल भुवनीं एकचि गती,
बसावें सांगातें दिनरजनिं त्यांहीं समसमा,
अगे या देहाचा मज दिसतसे हाचि महिमा. ११०
स्त्रिया न जरि चांगल्या सकळ होति साऱ्या स्वयें,
मुलें कशिं ग चांगलीं, उपजतील कोण्या नयें?
असे ग जशि खाण ती, तशिच पोटिं माती वसे;
असे जननि सद्गुणी, तरिहि बाळ तैसें असे. १११
जरी न जननी गुणी, तशिच उच्च देहीं मनीं,
कशीं सुगुणि लेंकुरें जनन पावती कोठुनी?
जया कुळिं घरीं मुलें उपजती अधीं तेथुनी,
गुणावगुण-अंकुर प्रगटती मुळापासुनी. ११२

ह्मणोनी स्त्रीतें-जी अखिल मनुजां भावि जननी-
सुधारावें यत्नें, सकल गुणिं तैसें तनिं मनीं,
तरी होती बाळें जननिसम तीं भूषण कुला;
नसे माते-अंगीं सुगुण, तरि ये कोठुनि मुला? ११३
जशी ती असे, तेविं होईल बाळ;
सवें तें तिच्या घालवी सर्व काळ;
तिच्यापाशिं रांगे, तिच्या हातिं खेळे,
पडोनी कुशी तें तिच्या नित्य लोळे. ११४
तिचें बोलणें चालणें बाळ पाही,
जयीं माय खांदे कटीं त्यास वाही;
न दे शिक्षणा ती, तरी ही शिके तें,
घडे जें बरें वावगें माय-हस्तें. ११५
असावी यासाठीं सकळगुणसंपन्न जननी,
मुलांच्या जी व्हावी परमकुशला योग्य अवनीं;
कशी होई योग्या, प्रबळ नर जों सांप्रत रितीं
हरोनी स्वातंत्र्या बुडविति सदा दास्यिं युवती? ११६
अगे साध्वी ऐकें तुजसि वरुनी मुक्त करिन;
तुझ्या स्वातंत्र्यातें न कधिंहि विवाहीं बुडविन;
नरांची गे बाधा तुज न कधिं होईल अणु ती;
धजे स्त्री गांजाया कवण नर? घेईन झडती! ११७
स्त्रियांच्या दास्याचें करिन, करुनी यत्न, हरण;
तुझ्या गे आनंदें करिन कृतिचें मी प्रसरण;
तुझ्या सांगातें मी झटुनि अवघ्या योग्य पुरुषां,
तुझ्या सत्कार्यार्थीं फिरविन सहाय्या दश दिशा. ११८
नको एकाकी तूं श्रम परि करूं या दृढपणें,
जगाच्या हालांचा तिळहि तुज ना स्पर्श घडणें;

तुझ्या सौख्यालागीं जगिं जंव जगें लाविन मन,
तुझ्या साह्या सारें करिन तुज-स्वाधीनचि धन. ११९

**साकी.**

दोघां-ठायीं असे योग्यता; आपण थोर कुळींचीं,
दोघें मिळुनी स्त्रीची सुधरूं स्थिति, दे तव कर, याचीं;
चढवूं उच्च पदा, । जगता असती ज्या सुखदा. १२०

**दिंडी.**

कशासाठीं स्त्री नरा-ऐशि व्हावी?
तिणें कां गे नरकृती आचरावी?
पुरुष-साम्याची कां मनीं वहावी?
नरांची गे कृति नरांनीं करावी ! १२१
पुरुष-नारी हीं आपुलिया देहीं;
तेविं मानस-घटनेंत भिन्न पाहीं;
पिंड पुरुषांचा असे निर्मियेला
शौर्य-धैर्याला, बळा दाविण्याला. १२२
स्त्रियांनीं गे परि गृहीं राहुनीयां,
सिद्ध व्हावें गृहकार्य तें कराया;
प्रेम जागवुनी नरां सौख्य द्यावें;
नरां ना तरि गे कुठे सौख्य व्हावें? १२३

**दादरा ठुंबरी.** राग पिलू, ताल एका.

"मौला मेरा जाने रे"—या चालीवर.

कोठें सौख्यालागीं गे! त्याणें जावें सांगें गे!
स्थान एकचि त्याला गे! ध्रु०
गृहिंचें सुख तें ॥ स्त्री पायीं जागे;
जो भोगी, तो जाणे गे! १ कोठें सौख्यालागीं गे०!

पद. राग काफी, ताल त्रिवट.

("संया करे चतुराई रे"—या चालीवर.)

सुख नुरे मनुजास गे, । सुख नुरे, तनु झुरे, ।
अंतरे स्त्री-प्रेमा ज्यास! ध्रु०
काय नर-तनुनें जननिं मरणिं पडावें । फुकट
भवजंजाळीं? । स्त्रीविणें गृह उदास; १ सुख नुरे. १२५

श्लोक.

परस्पर जयीं अगे निज-समागमें स्त्री-नर
बघोनि गुणदोष तीं करितिल स्वरूपांतर—
स्त्रिया प्रबल अंशतः, नर मनीं तसे कोमल,
तयेच समयीं जगीं सफळ आयु तें होइल. १२६

आर्या.

विद्या संपादावी, परि गृहकृत्या कधीं न त्यागावें;
संसारीं निजभर्त्त्यां सुख संतत होइ, तेविं वागावें. १२७
वाढवुनी निजबाळा, बाळासम शुद्धचित्त राहावें,
ऐसा परमेशाचा आहे संकेत पूर्ण समजावें. १२८

श्लोक.

प्रसंग मग येइ कीं पुरुष सर्व तैशा स्त्रिया
मनें करुनि मोकळीं, सुख परस्परां द्यावया
प्रयत्न करिती, जयीं विषमता नुरे लेशही;
स्वतंत्र, परि ऐक्य तीं करुनि, शोभवीती मही. १२९

दिंडी.

होइ जगताचा तयीं समुत्कर्ष;
दुभावाचा होणार न तो स्पर्श;

अंतिं भुवनीं उपजेल योग्य काळीं
जाति मनुजाची पूर्ण भाग्यशाली." १३०

साकी.

नृपतनयाचे शब्द ऐकुनी सुस्कारा ती टाकी,
बोले:-"तैसें घडणें दिसतें अशक्य या भूलोकीं."
नृपसुत उत्तर दे; । ऐका, तिजला काय वदे:-१३१

श्लोक. (अश्वधाटी)

" नारीनरांमधिं असारा नको दुफळि, हारीं पडाल जगतीं; ।। भावा मनीं सकल ठेवा, नका करूं दुभावा, वदें निजमती ! ।। नाहीं सुखी पुरुष गेहीं स्त्रियेविण कदाही, पती सुखवि ती; ।। दावोनि कोमळ ळळा सर्वदा पुरुषपादांस सेविति सती. १३२

पद. जिल्हा झिंजोटी. ताल त्रिवट.

( "चंद्रकेतु रविवंशीं"—या चालीवर. )

व्यर्थ जिणें, नरनारी एकटिं तीं राहतां;
स्त्री-पुरुषीं ऐक्य व्हावें, इष्ट असे विवाहितां;
पुरुषांगीं न्यूनता जी, निवटो स्त्री पूर्ण ती !
स्त्रीमाजी उणिव जी हो, पुरुष हरो तिजप्रती ! १३३

साकी.

ऐसें झाल्या होइ सफळ तो लग्नाचा उद्देश;
पूर्ण असे तो विवाह, जेथें भेद नुरे लवलेश;
दोघां हृदयांचा । झाला संधि तेथ साचा. १३४
बळें लाविल्या गांठि, ह्मणुनि का मन मनाशिं जुगतें तें?
'विधिनें गांठी बांधियल्या'—हें वचन न ये कामातें;
लग्नीं हृदयांची । व्हावी जोड सदा साची." १३५

श्लोक.

शा हो भ्रमामाजि," तैं राजबाळी
"राहिलें व्यर्थ मी एककाळीं;
पासुनी कोणच्या भाग्यशाली
ां ज्ञान हें; वृत्ति ही प्राप्त झाली!" १३६

श्लोक.

नें तीतें बहुत विनयें उत्तर दिलें,
ं स्त्रीसंबंधें विविध परि ज्ञाना मिळविलें;
्या मैत्रीचा परम सुख भोक्ता अग असें!
ोणें ना तें सुख पुरुषजातीप्रति दिसे. १३७

ाशिविणें जशी कधिं न येइ शोभा पुरी,
ण तशी न ये कधिं जना गृहा-भीतरीं;
क बहू असें मजसि ज्ञान हें लाभलें
-करिं वाढतां, अधिं तिच्या मुखें ऐकिलें. १३८

ाकळांस ती बहु-रिती होती सुवंद्या प्रिया,
सुनी दिसे सकळिकां भूलोकिंची कीं न या;
ुणि ही असे उतरली स्वर्गीतली देवता,
ुवनांत या सकळ त्या द्याया स्त्रियां धन्यता. १३९

दिंडी.

अशा मातेच्या उदरिं जन्मलों, हें
मातृलक्षण मम सकळ देहिं राहे;
ह्मणुनि जन्मापासोनि मम मनांत
स्त्रियांविषयीं सुविचार नांदतात. १४०
धन्य, जन्मे जो अशा माय-पोटीं;
असे थोडकियां भाग्य हें ललाटीं!

तोचि ओळखितो पुरा स्त्रीस्वभावा—
नरा मैत्रिण स्त्री अशा धरी भावा." १४१

सती बोले तयिं तया इंदिरा ती;–
"अशा मातेच्या वाढला सुहृत्तीं,
काय मज ऐशा वरुनि, पामरीं तो
प्रेम ठेविल? का पुरवुं शके हेतो? १४२

### श्लोक.

वाटे मला क्षुद्र असें बहू मी,,
नाहीं जगाच्या मुळिं कांहिं कामीं;
माझ्यावरी ठेवुनि प्रेमभावा
संसारिं लाभेल कुणा विसांवा?" १४३

बोले तदा तो तिज राजपुत्रः–
"प्रीतीस माझ्या असशी सुपात्र!
मी बाळ होतों तंवपासुनीयां,
देहास गे वाहियलें तुला या! १४४

हो तूंच माझी सुखदा सुजाया;
गे लाविली त्वां मजलागिं माया!
त्वां रक्षिला प्राण दयाळु हातें,
संसारसौख्या तरि देइं मातें. १४५

होती जिवाच्या-वरि धाड आली,
पाजोनियां औषध दूर केली;
त्वां अन्नपाणी मुखिं घालियेलें,
तैं प्राणतंतूप्रति लांबवीलें. १४६

जरी व्यंग कांहीं तुझ्या अंगिं नांदे,
तरीही मला सुंदरी तूं वरूं दे;

तुझ्या अंगिं जें व्यंग तें माणसीं गे
बहू थोडकें सर्व व्यक्तींत जागे. १४७

जशी आहेशी तूं, तशि मज पुरी भावशि भली;
पहाया स्त्री जातां सकळ–रिति पूर्णा प्रतिकुळीं
प्रतापें यत्नें ही जगिं हुडकिल्या नाहिं मिळणें;
तुझ्या ऐशी स्त्री गे कधिं वरिलिसे काय कवणें? १४८

साकी.

तृप्ति मनाची न होइ जों जों पाहीं तव मुख-चंद्रा,
इंद्रभुवनिं का अधिक याहुनी सौख्य होतसे इंद्रा?
नाहीं जोड तुला! । सखये, वरुनी सुखविं मला! १४९

श्लोक.

वर बघिं सखये तूं पाहिं गे या मुखाला!
नयन उघडिं, सौख्या पाववीं उत्सुकाला!
क्षितिजि उगवुनी तो भानु जेवीं जगातें
सुखकर बहु होई, होइं तूं तेविं मातें! १५०
श्रम अजिवरि केले, सार्थता प्राप्त झाली,
समरिं हरुनि गेलों, इंदिरा जाणियेली!
तव करिं पय-पाणी-अन्न म्यां सेवियेलें,
पुनरपि बळ आलें, तैं तुला मोहियेलें! १५१

श्लोक. ( मणिबंध. )

होइं ग! आतां तूं नवरी!
बोलुं नको गे! कीं 'न वरीं';
दाविं सुखा संसारिं मला,
प्रेमभरें रक्षीं मजला! १५२
आणिक सांगूं काय तुला?
कंठ वदे हें, तैं सुकला!

तूं असशी गे प्राणप्रिया !
पाणि तुझा गे ! दे धरण्या ! १५३

पद. राग भूप, ताल त्रिवट.

( "ललचावते"—या चालीवर." )

वर गे वर सुंदरी मातें ! आलों आशा
धरुनी वरण्या तुला बहू यत्नें गे ! ॥ ध्रु० ॥
पुरविं मनीषा, पाणि मला दे, घे तुझ्या
पदरीं मला; उभयतां होऊं सुखी प्रिये ॥ वर गे
वर० ॥ १ ॥ १५४.

पद.

( "सुंदरमुख तुंदिलतनु"—या चालीवर. )

सखि ! तव सुखदायक मुखकमळ विमळसें
सुललित अलिसम लक्षुनि तृप्त होतसें. ध्रु०
सरळ नाक, कुरळ केश, विरळ दंत ते,
नयन विनयभरित बघुनि हरिणि लाजते,
गजगति तव कोमळ पदिं बहु विराजते;
ये गे ! वेगें, संगें हृद्रमणी ! चिद्धरणी ! सुखतरणी
उगवुं दे सवें ॥ १ ॥ सखि ! तव०
धी प्रचंड पंडितजनमान खंडिते,
आचरण प्रेमळ बहु कुजन दंडितें,
मधुर वचन वाद कधिं न करि वितंड तें,
तोषी ऐशी राशी सुगुणांची, सुकृताची; कर याचीं,
'**वरिन**' वद मुखें ! ॥ २ ॥ सखि तव०
ललना अशि, भाग्यशालि नर असेल जो,
त्यासि सुलभ; दिव्य रूप तो तुझें पुजो,
प्रेमलता तव हृदिं मज उद्देशूनि रुजो !

धराल माझ्या कार्या हातीं,
कराल सिद्धी जाणें निश्चितीं,
मुळिंच मजला कांहीं भीती
नुरली हो आतां. १६१

पद. ( "बहुत छलियलें "—या गर्भ्याचे चालीवर. )

वरिन तुह्मांप्रती; नाहीं स्त्रीला अन्य गती ! ध्रु० ॥
या—उपरी राहूं ऐक्यें या । तुह्मि आह्मी ! प्रेमें
सौख्यें अवघ्या जन्मीं विलसूं या ! हो भारी
तुह्मी श्रमलां, यशस्वि जाहलां अंतीं ! वरिन"० १६२

श्लोक.

बोले राजकुमार तैं हरिखुनी:—"अंतीं तुला भावलों !
झालों मी कृतकृत्य गे अजि अहा ! जें इच्छिलें, पावलों;
जाये ! मेळविलें तुला श्रम—नुदे ! इच्छा नुरे या मना ;
ठेवोनी तुजठायिं चित्त, तुजला सेवीन सर्वात्मना"! १६३

पद. रागिणी भैरवी, ताल त्रिवट, पंजाबी.

("अब मोरी छांड दे "—या चालीवर.)

सुफळित जाहलें, । आणिलें तडीं विचारें सारें; ॥
संधि झाला शेवटिं हा ! ॥ ध्रु० ॥
कवणा इच्छित जरि पाहिजे, ॥
दम धरुनि करितां श्रमचि ये साधुंहि तया नरा;
सुफळित० १६४.

**संलग्ननामक सातवा सर्ग समाप्त.**

---

धराल माझ्या कार्या हातीं,
कराल सिद्धी जाणें निश्चितीं,
मुळिंच मजला कांहीं भीती
नुरली हो आतां. १६१

पद. ( "बहुत छळियलें "—या गर्भ्याचे चालीवर. )

वरिन तुह्मांप्रती; नाहीं स्त्रीला अन्य गती ! ध्रु० ॥
या—उपरी राहूं ऐक्यें या । तुह्मि आह्मी ! प्रेमें
सौख्यें अवघ्या जन्मीं विलसूं या ! हो भारी
तुह्मी श्रमलां, यशस्वि जाहलां अंतीं ! वरिन"० १६२

श्लोक.

बोले राजकुमार तैं हरिखुनीः—"अंतीं तुला भावलों !
झालों मी कृतकृत्य गे अजि अहा ! जें इच्छिलें, पावलों;
जाये ! मेळविलें तुला श्रम—नुदे ! इच्छा नुरे या मना ;
ठेवोनी तुजठायिं चित्त, तुजला सेवीन सर्वात्मना"! १६३

पद. रागिणी भैरवी, ताल त्रिवट, पंजाबी.

("अब मोरी छांड दे "—या चालीवर.)

सुफळित जाहलें, । आणिलें तडीं विचारें सारें; ॥
संधि झाला शेवटिं हा ! ॥ ध्रु० ॥
कवणा इच्छित जरि पाहिजे, ॥
दम धरुनि करितां श्रमचि ये साधुंहि तया नरा;
सुफळित० १६४.

संलग्ननामक सातवा सर्ग समाप्त.

---